

दासवरेण्य कनकदास विरचित

# हरिभक्तिसार

मराठी रूपांतर - भावार्थसहित

मराठी काव्य रूपांतर व भावार्थ

आल्हाद गो. आपटे

सुरेश राव

दासवरेण्य कनकदास विरचित

# हरिभक्तिसार

मराठी


अनुवादक

मराठी काव्य रूपांतर व भावार्थ

**आल्हाद गो. आपटे**

निवृत्त वैज्ञानिक, भाभा परमाणु अनुसंधान केंद्र

अर्थविवरण व अनुवादसाहाय्य

**सुरेश राव**

निवृत्त वैज्ञानिक, भाभा परमाणु अनुसंधान केंद्र



**कनकदास अध्ययन संशोधन पीठम्**

राष्ट्रकवि गोविंद पै संशोधन केंद्र, माहे

एम.जी.एम. महाविद्यालय कॉम्प्लेक्स, उडुपि – ५७६ १०२

२०२२

**Haribhakthisara** – Composed by Kanakadasa. Explanation in Marathi by Shri Ahlad G. Apte. Assistance in translation by Suresh Rao. Published by Kanakadasa Adhyayana Samshodhana Peetha, Rashtrakavi Govinda Pai Samshodhana Kendra, Udupi – 576 102. Ph.: 0820 – 2521159, E-mail – rgpaiudupi@gmail.com

Year of Publication 2022

Size : 1/8 demi

Paper Used : 70 gsm Maplitho – NS

Pages : 88 Price : Rs. 45/-

Layout and Design : Savitha Shanthapriya

Printed at Prakash Offset Printers, Mangalore

# विषयानुक्रमणिका



* * *

# Publisher's Note

Kanakadasa is a major saint poet of $16^{th}$ Century hailing from Karnataka. This phase of medieval India is also marked by Bhakti movement which tries to communicate with what is considered to be the cosmic consciousness without any mediator. Kanakadasa was one such voice of spiritual protest within the tradition itself.

Kanakadasa Adhyayana Samshodhana Peetha Udupi was set up in the year 2008 under auspices of Rashtrakavi Govinda Pai Samshodhana Kendra. The Centre has published many books on Dasa Sahithya and related literature, so far in Kannada.

The Centre is now bringing out its first Marathi publication of Haribhaktisara. It is an important poetical work composed by Kanakadasa bringing out the essence of Bhakthi movement. It is necessary that the essence of Kanakadasa's mind should reach beyond the borders of Kannada language.

In this context the book has a special significance and I sincerely thank Shri Alhad Apte and Shri Suresh Rao who have not only painstakingly tried to capture the spirit of Haribhaktisara but also maintained the same *Chhandas* (Bhamini Shatpadi) in Marathi.

I also thank Savitha Shanthapriya for neat execution of computer composition of the book. Special thanks to Prakash Offset Printers, Mangalore for the excellent work of printing. Thanks also to my colleagues for their cooperation.

Udupi
2st April 2022, Chandra Ugadi

**Prof. Jagadish Shetty**
Co-ordinator
RGPai Research Centre
MAHE-Manipal

# पूर्वोक्ती

आपल्या भाषा आणि त्या भाषांतील साहित्य आणि अर्थातच आपल्यासारखे सर्व भाषाभिमानी यांची विचारसरणी वृद्धिंगत व्हायची असेल तर आपण इतर भाषातील श्रेष्ठ साहित्य आपलेच मानले पाहिजे. त्यासाठी ते मूळ भाषेतून वाचता आले नाही तरी निदान अनुवादातून समजून घ्यायला हवे. 'हिंद स्वराज' ह्या १९०९ साली लिहिलेल्या पुस्तकात असाच भाषाविषयक दृष्टिकोण गांधीजींनी निःसंदिग्धपणे मांडला आहे.

मराठीपुरते बोलायचे तर कानडी, कोकणी, तेलुगु, गुजराती या महाराष्ट्राच्या शेजारच्या राज्यातील भाषा. सीमेवरील काही भागात द्विभाषिक व्यवहार चालतोही. खरे तर देशातील बहुसंख्य लोक हे बहुभाषिक असेच आहेत. तरीही इतर भाषांतील साहित्याकडे पाहण्याची आपल्या भाषाभिमान्यांची वृत्ती क्षीण आहे. मराठी आणि कानडी यांचा दीर्घकाल संबंध आहे. द. रा. बेंद्रे, आद्य रंगाचार्य, गिरीश कार्नाड हे साहित्यिक आणि कुमार गंधर्व, भीमसेन जोशी यासारखे अनेक गायक यांनी या भाषांतील पूल बांधण्याचे काम काही प्रमाणात केले असले तरी आपल्याला अजून खूप काही करणे आवश्यक आहे आहे.

वास्तविक भक्तिपरंपरा हा एक माणसा-माणसातील आणि भाषाभाषातील फार मोठा दुवा आहे. यासंबंधी अभ्यासू वृत्तीने रा. चिं. ढेरे यांच्यासारख्या विद्वानांनी खूप लिहून ठेवले आहे. परंतु आवश्यकता आहे ती प्रत्यक्ष संतांचे लिखाण भाविक आणि अभ्यासक या दोहोंनी ही आत्मसात करण्याची. पुरंदरदास आणि कनकदास हे श्रेष्ठ संत कवी संगीतकार मानले जातात, विशेषतः पुरंदरदास, जे कर्नाटक संगीताचे पिता मानले जातात. हिंदुस्थानी शास्त्रीय संगीतात बंदिशी या बहुतेक

संगीतकारच लिहितो. फक्त बंदिशींचे साहित्य लिहिताना बहुतेक रचना-कारांचे लक्ष सांगीतिक रचनेकडे जास्त असते. पारंपारिक बंदिशीत अनेकदा तेच तेच जुने शब्द आणि कल्पना आढळतात. नवीन कल्पना किंवा विचार काही बंदिशींत अपवादात्मक रित्या आढळले तरी तो त्यांचा मुख्य हेतू नसतो.

दक्षिणेतील संतकवी या बाबतीत वेगळे आहेत. त्यांनी संगीताला, तसेच साहित्याला दिलेले योगदान आज अनेक शतकांनंतरही महत्त्वाचे ठरले आहे. त्यांच्या कृतीतील काव्य आणि विचारही तेवढेच महत्त्वाचे आहेत.

संगीत व साहित्य या दुहेरी क्षेत्रात पुरंदरदास (१४८४-१५६४) आणि कनकदास (१५०९-१६०९) सदावंदनीय मानले जातात. या दोघांच्याही रचनांचा परिचय आल्हाद आपटे यांनी करून दिला आहे. पुरंदरदास यांचे मूळ नाव श्रीनिवास नायक. त्यांचा जन्म महाराष्ट्रात पुरंदरजवळ झाला अशी वदंता आहे. परंतु त्यांचे जन्मस्थान कर्नाटकातील शिमोगा जिल्ह्यात असल्याचे आधार आता उपलब्ध होत आहेत. यावर अधिक संशोधन सुरू आहे. पुरंदरदसांमधील उर्मट कंजुषी वृत्ती लोप पावून त्यांच्यातील संतप्रवृत्ती त्यांच्या पत्नीमुळे कशी जागी झाली याबद्दल आख्यायिका आहेत. एकदा विचार आणि आचार बदलल्यावर मात्र त्यांनी दक्षिणेतील विविध सांगीतिक परंपरा जोडणारी अशी संयुक्त परंपरा कर्नाटक संगीतात निर्माण केली आणि असंख्य रचना केल्या. उत्तरेच्या संगीतातही त्या प्रचलित आहेत. आज त्यांच्या अशा उपलब्ध रचना ८०० च्या घरात आहेत आणि त्या आपण गायकांकडून ऐकत असतो. आपटे यांनी काही वर्षांपूर्वी आपल्याला पुरंदरदास यांच्या काही रचनांची मराठीतून ओळख करून दिली आहे.

आता ते कनकदास यांच्या रचनांची ओळख करून देत आहेत. कनकदास हे कवी आणि संगीतकार तर होतेच. शिवाय त्यांचे सामाजिक कार्यही तितकेच महत्त्वाचे आहे. तसे पाहता ते सुरुवातीला एक वीरपुरुष म्हणून ओळखले जात. एका लढाईत ते गंभीर जखमी झाले आणि मरता

मरता वाचले. त्यानंतर त्यांनी आपला जीवनक्रम बदलला. ते संगीत आणि भक्तीकडे वळले. ते निम्न जातीचे समजले जात. म्हणून उडुपीच्या कृष्ण मंदिरात दर्शनासाठी गेले असता त्यांना मंदिरात प्रवेश मिळेना. त्यांनी मंदिराच्या पाठच्या बाजूने धावा करण्यास सुरुवात केली. आख्यायिका अशी की अखेरीस ती मूर्ती वळली आणि आजही मंदिराचे प्रवेशद्वार पूर्वेस असले तरी मूर्तीचे दर्शन घेण्यासाठी भाविकांना पश्चिमेकडे जावे लागते.

पण कनकदासांचे कर्तृत्व इतकेच नाही. त्यांनी अनेक पद्ये रचली, संगीतबद्ध केली. मुख्य म्हणजे त्यांचे विचार आजही परिवर्तनशील आणि उदारमतवादी मानले जातील. आज दलित आणि स्त्रियांसारखे समाजाचे जे वंचित घटक समजले जातात त्यांच्यासाठी त्या काळात ते प्रत्यक्षात झटत होते आणि त्यांच्या साहित्यातूनही तसे स्पष्ट दिसते. म्हणून त्यांच्या साहित्याचा परिचय करून घेणे आजच्या परिस्थितीत विशेष महत्त्वाचे आहे.

निव्वळ काव्यशास्त्राच्या दृष्टीने आणखी एक वैशिष्ट्य अनुवादकाने लक्षात घेतले आहे. हरिभक्तिसार हा काव्यग्रंथ 'षटपदी' या अनोख्या छंदात रचला आहे. त्याचे उच्चार आणि सांगीतिक रूप यांचे वेगळेपण लक्षात घेऊन अनुवादकाने मराठीत तो छंद आणण्याचा प्रयत्न केला आहे. ही कवने जर गायची तर तीही छंदाचे हे नियम लक्षात घेऊनच. एका अर्थी संगीतकारांवर हे एक बंधन पडते.

या एकशे आठ षटपदी आणि त्याच छंदातील मंगलाचरण सादर करुन आल्हाद आपटे थांबले नाहीत. त्यांनी वाचकांच्या सोयीसाठी भावार्थ, कठीण शब्दांचे अर्थ आणि योग्य ते संदर्भ ही दिले आहेत. वास्तविक पुरंदरदास आणि कनकदास यांचा संपूर्ण परिचय मराठीतून व्हायला हवा आहे. या कामाची सुरुवात मनोभावे करण्याबद्दल त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडे. यात त्यांनी आपले स्नेही श्रीयुत सुरेशराव यांची मदत मुक्तपणे घेतली आहे. त्या दोघांचेही अभिनंदन.

सीमा प्रांतात व इतरत्र असलेले दोन्ही भाषा जाणणारे किंवा ज्या ज्ञातींचे रसिक मराठी आणि कानडी या दोन्ही भाषांशी परिचित आहेत अशांनी ह्या प्रकारची कामे केल्यास किंवा करून घेतल्यास भाषाभाषांतील वितुष्ट राहणार नाही.

मुंबई

रामदास भटकळ

# मनोगत

सुमारे दहा वर्षापूर्वी आम्ही दोघांनी संत पुरंदरदास यांच्या पंधरा कृती मराठीमध्ये आणून त्यांचा एक संगीत अल्बम बनवला. त्यावरील एक संगीत कार्यक्रम आम्ही उडुपीच्या कृष्ण मंदिरात डिसेंबर २०११ मध्ये सादर केला. त्यावेळी संत कनकदास यांच्या विद्वत्तापूर्ण साहित्य कृतींचा मराठीत अनुवाद करावा अशी सूचना तेथील विद्वज्जनांनी केली. दहा वर्षानंतर त्या दिशेने एक छोटासा प्रयत्न आम्ही करू शकलो याचा खूप आनंद होत आहे.

संत कनकदास यांची 'हरिभक्तिसार' ही श्रीविष्णूच्या भक्तिरसाने ओथंबलेली आणि तात्त्विक बैठक असलेली एक साहित्यकृती आहे. तिचे वैशिष्ट्य म्हणजे ती मराठी साहित्याला अपरिचित अशा 'भामिनी षटपदी' या मात्रावृत्तात बांधलेली आहे. या साहित्यकृतीचा मराठीत छंदोबद्ध अनुवाद करायचा व तो मूळच्या वृत्तात त्याचे सर्व नियम पाळून करावयाचा हे आव्हान आम्ही स्वीकारले. अनुवाद लयीमध्ये सहज गेय असावा आणि पठण करता करताच त्याचा अर्थ शक्य तितका स्पष्ट व्हावा ही उद्दिष्टेदेखील आम्ही पुढे ठेवली. या प्रयत्नांमध्ये किती यश मिळाले ते वाचकच अजमावू शकतील. 'भामिनी षटपदी' या वृत्ताविषयी अधिक माहिती पुढे दिली आहे.

संत कनकदासांच्या 'हरिभक्तिसार' मध्ये ईशप्रार्थना, पौराणिक संदर्भ, जीवनमृत्यूचे तत्त्व असे अनेक विषय येतात. हरिभक्तीमधून जीवनाच्या तत्त्वज्ञानाचे दर्शन कनकदास आपल्याला घडवतात. आम्हा दोघांपैकी सुरेश यांनी त्याचा अभ्यास व संशोधन करून हरिभक्तिसार, त्यातील अर्थ व तत्त्व इंग्रजी, मराठी अशा मिश्र भाषांतून उलगडून दाखवले आणि आल्हाद यांनी मूळ आशय कायम ठेवून 'भामिनी षटपदी' याच वृत्तामध्ये हरिभक्तिसाराचा मराठीत गेय अनुवाद केला. अशी

विभागणी करून अनुवादाचे हे काम करताना कन्नड व मराठी भाषांची समद्धीही प्रतीत होत गेली. हरिभक्तिसार मराठीत आणण्याची प्रक्रिया अतीव आनंद देऊन गेली.

कनकदास अध्ययन संशोधन पीठम्, उडुपी यांनी या कार्यात स्वारस्य दाखवले व पुस्तक प्रसिद्धीपर्यंत सर्व जबाबदारी स्वीकारली याबद्दल त्यांचे आभार.

श्री रामदास भटकळ यांचे साहित्यनिर्मिती आणि साहित्यप्रकाशन, तसेच साहित्याचे आंतरभारतीय रूपांतर या क्षेत्रांमधील कार्य आपण सर्व जाणतोच. त्यांनी या कामाला प्रस्तावना लिहून आशीर्वाद दिले. असेच आशीर्वाद त्यांनी आमच्या पुरंदरदासांच्या भक्तिगीतांच्या अल्बम प्रकाशना-वेळीही दिले होते. त्यांना वंदन.

हरिभक्तिसार मराठी वाचकांना वाचनानंद आणि पठनानंद देईल असा विश्वास वाटतो.

आल्हाद गो. आपटे

सुरेश राव

# NOTE

South Indian readers may note that, in Marathi, only elongated vowels of "e" and "o" are used.

मराठीत 'ए' आणि 'ओ' यांची केवळ दीर्घ रूपेच वापरली जातात याची दक्षिण भारतीय वाचकांनी कृपया नोंद घ्यावी.

ಮರಾಠಿಯಲ್ಲಿ 'ಎ' ಮತ್ತು 'ಏ' ಗೋಸ್ಕರ 'ಏ'ಯನ್ನು, ಹಾಗೂ 'ಒ' ಮತ್ತು 'ಓ' ಗೋಸ್ಕರ 'ಓ'ವನ್ನು ಮಾತ್ರವೇ ಬಳಸಲಾಗುತ್ತದೆ. ಪ್ರಾಸಬದ್ಧವಾಗಿ ಓದುವಾಗ ಈ ಅಂಶವನ್ನು ಗಮನದಲ್ಲಿರಿಸಿಕೊಳ್ಳಬೇಕು.

# भामिनी षटपदी

भामिनी षटपदी हे कन्नड व इतर काही भाषांतील काव्यरचनांमध्ये वापरल्या जाणाऱ्या षटपदी वर्गातील एक मात्रावृत्त आहे. यातील प्रत्येक षटपदीमध्ये सहा पदे म्हणजेच सहा ओळी असतात. पहिल्या, दुसऱ्या, चौथ्या आणि पाचव्या ओळींमध्ये प्रत्येकी सात मात्रांचे दोन खंड अशा एकूण चौदा मात्रा असतात. तिसऱ्या व सहाव्या ओळीमध्ये सात मात्रांचे तीन व एक मात्रेचा एक असे चार खंड असतात. सात मात्रांच्या प्रत्येक विभागात दोन उपखंड असून ते अनुक्रमे तीन व चार मात्रांचे असतात. अशा रितीने सहा ओळींमध्ये अनुक्रमे १४, १४, २२, १४, १४, २२ अशा मात्रा असतात. षटपदीचे लयीमध्ये वाचन किंवा गायन करताना तिसऱ्या व सहाव्या ओळींच्या शेवटी सहा मात्रांचा विराम घेतला जातो.

तीन मात्रांच्या खंडात २+१ किंवा १+१+१ अशा मात्रांची अक्षरे घेता येतात. चार मात्रांच्या खंडात २+१+१, २+२, १+१+२ किंवा १+१+१+१ अशा मात्रांची अक्षरे घेता येतात. खंडांच्या सीमेवर जोडाक्षर येत असल्यास काही नियम पाळावे लागतात. या नियमांचा मुख्य उद्देश लयीतील पठण व गायन ओघवते व्हावे हा आहे.

षटपदीमधील प्रत्येक ओळीचे दुसरे मूळाक्षर तेच असावे लागते. मात्रांमधील त्याची जागा आणि त्या अक्षरातील मात्रांची संख्या, १ किंवा २, ही सारखीच असावी लागते.

भामिनी षटपदीचे तालात गायन किंवा वाचन करण्यासाठी १४ मात्रांचे ताल उपयुक्त असतात.

# हरिभक्तिसार

**श्रीयधिप गांगेयनुत कौं**
**तेय वंदितचरण कमलद**
**लायतनयन रूप चिन्मय, देवकीतनय ।**
**राय रघुकुलवर्य विप्रा**
**प्रीय सुरलोकस्थ राजस**
**राय चतुरोपाय आम्हा रक्षि अनवरत ॥ १ ॥**

। श्रीयधिप गांगेयनुत कौंतेय वंदितचरण, कमलदलायतनयन रूप, चिन्मय, देवकीतनय ॥ । राय रघुकुलवर्य विप्रा प्रीय सुरलोकस्थ, राजसराय चतुरोपाय, आम्हा रक्षि अनवरत ॥१॥

**भावार्थ** हे लक्ष्मीपती, गंगापुत्र भीष्म तुझी स्तुती करतो, कुंतिपुत्र पांडव तुझ्या चरणी वंदन करतात. तुझे नेत्र कमलदलाप्रमाणे दीर्घ, विशाल आहेत. हे देवकीतनया, तू चैतन्यस्वरूप आहेस. हे देवलोकवासी राया, रघुकुलोत्तम असा तू ब्राह्मणप्रिय आहेस. हे राया, तुझे रूप राजस, सुंदर आहे. साम, दाम, दण्ड, भेद या चारही उपायांमध्ये निष्णात आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा :** कमलदलायतनयन शब्दातील आयत म्हणजे लांब, दीर्घ कनकदासांनी देवलोकासाठी सुरपुर तर ब्राह्मणांसाठी भूसुर हा शब्द वापरला आहे.

**देव देव जगद्भरित वसु**
**देवसुत जगदेकनाथ र**
**माविनोदित सज्जनानत निखिल गुणभरित ।**
**भावजारिप्रिय निरामय**

रावणांतक रघुकुलाप्रति
देव असुरविरोधि आम्हा रक्षि अनवरत ॥ २ ॥

। देवदेव जगद्भरित वसुदेवसुत जगदेकनाथ रमाविनोदित सज्जनानत निखिल गुणभरित ॥ । भावजारिप्रिय निरामय रावणांतक रघुकुलाप्रति देव, असुरविरोधि, आम्हा रक्षि अनवरत ॥ २ ॥

**भावार्थ** हे विश्वव्यापी देवांच्या देवा, हे वसुदेवसुता, तू या जगाचा एकमेव नाथ आहेस. लक्ष्मीबरोबर विलास करणाऱ्या सकलगुणसंपन्न अशा तुला सर्व सज्जन नमस्कार करतात. मदनाचा शत्रू असलेल्या शंकराला तू प्रिय आहेस. तू निरामय, संपूर्ण दोषरहित आहेस. तू रावणाचा अंत केलास. तू रघुकुलाचा देव आहेस. तू असुरांचा विरोधी आहेस. तू आमचे आंड रक्षण कर.

**टीपा** भावज म्हणजे हृदयात जन्मलेला, म्हणजे प्रेमदेवता मदन.ख

अनुपमेयचरित्र कारु
ण्यनिधि भक्तकुटुंबि योगी
जनहृदय परिपूर्ण नित्यानंद निगमनुत ।
वनजनाभि मुकुंद मुरम
र्दन जनार्दन त्रैजगत्पा
वन सुरार्चित देव आम्हा रक्षि अनवरत ॥ ३ ॥

। अनुपमेयचरित्र कारुण्यनिधि भक्तकुटुंबि योगीजनहृदय परिपूर्ण नित्यानंद निगमनुत ॥ । वनजनाभि मुकुंद मुरमर्दन जनार्दन त्रैजगत्पावन सुरार्चित, देव आम्हा रक्षि अनवरत ॥ ३ ॥

**भावार्थ** तुझे चारित्र अनुपमेय, अद्वितीय आहे. तू करूणेचा सागर आहेस. सर्व भक्तजन तुझे आप्तच आहेत. तू योगीजनांच्या हृदयात वास करतोस. तू आम्हासाठी परिपूर्ण असा आनंद आहेस. वेद तुझी

स्तुती करतात. हे मुकुंदा, तुझ्या नाभीतून कमळ फुलते. तू मुरासुराचे मर्दन केलेस. यशप्राप्तीसाठी व मोक्षप्राप्तीसाठी भक्त तुझी प्रार्थना करतात. हे जनार्दना, तू दुष्टांचे निर्दालन करतोस आणि त्रैलोक्यास पावन करतोस. देव तुझी पूजा करतात. हे देवा, तू अखंड आमचे रक्षण कर.

**टीपा** निगम म्हणजे वेद. वनज म्हणजे कमळ.

'जनार्दन' या श्रीविष्णूच्या नामाचे दोन अर्थ आहेत – एक अर्थ "दुष्टांना पीडा देणारा" व दुसरा अर्थ "भवसागर पार करण्यासाठी व मोक्षप्राप्ती साठी भक्त ज्याची प्रार्थना करतात".

**कमल संभव विनुत वासव**
**नमित मंगलचरित दुरित**
**क्षमित राघव विश्वपूजित विश्व विश्वमय ।**
**अमितविक्रम भयद सीता**
**रमण वासुकिशयन खगपति**
**गमन कंजजजनक आम्हा रक्षि अनवरत ॥ ४ ॥**

। कमल संभव विनुत वासव नमित मंगलचरित दुरितक्षमित राघव विश्वपूजित विश्व विश्वमय ॥ । अमितविक्रम भयद सीतारमण वासुकिशयन खगपतिगमन कंजजजनक, आम्हा रक्षि अनवरत ॥ ४ ॥

**भावार्थ** कमळातून उत्पन्न झालेला असा ब्रह्मदेव ज्याचे स्तवन गातो, देवांचा राजा इंद्र ज्यास नमन करतो, अशा तुझे चारित्र्य मंगल आहे. भक्तांच्या पातकास तू क्षमा करतोस. हे राघवा, सर्व विश्व तुझी पूजा करते. तू विश्वमय आहेस. तूच विश्व आहेस. तुझे शौर्य असीमित आहे. तू बलवान योद्धयांनाही भयभीत करतोस. हे सीतापती, वासुकी नाग ही तुझी शय्या असून पक्षीराज गरुड तुझे वाहन आहे. कमलोद्भव ब्रह्मदेवाचा तू जनक आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

टीपा वासव हे इंद्राचे नाव आहे. कंज म्हणजे कमळ. कंजज म्हणजे कमळातून जन्मलेला. श्रीविष्णूच्या नाभीतून उपजलेल्या कमळामधून ब्रह्मदेव जन्मला असे मानतात.

**क्षीरसागरशयन शांता**
**कार विविधविचार गगना**
**धार नवनीतहर गोपीमित्र भवदूर ।**
**मारपित गुणवंत सरसा**
**कार रिपुसंहार तुंबरु**
**नारदप्रिय वरद आम्हा रक्षि अनवरत ॥ ५ ॥**

। क्षीरसागरशयन शांताकार विविधविचार गगनाधार नवनीतहर गोपीमित्र भवदूर ॥। मारपित गुणवंत सरसाकार रिपुसंहार तुंबरुनारदप्रिय वरद आम्हा रक्षि अनवरत ॥५॥

**भावार्थ** दुधाचा सागरात तू शयन करतोस. शांततेची मूर्ती असा तू विविध विचारी आणि विविध संचारी आहेस. तू गगनाचा आधार आहेस. तू गोपींचा सखा आहेस. नवनीतहरण करतोस. भवसागराच्या फेऱ्यापासून तू दूर आहेस. तू मदनाचा पिता आहेस. तू सर्वगुणांनी युक्त, सर्वांगसुंदर आहेस. तू शत्रूंचा संहारक आहेस. नारद व तुंबरू यांना तू प्रिय आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** मार हे मदनाचे नाव आहे.
'विचार' हा शब्द दोन अर्थांनी लागू पडतो. विचार करणे आणि संचार करणे.

**तामरसदलनयन भार्गव**
**राम हलधरराम दशरथ**
**राम मेघश्याम सद्‌गुणधाम निस्सीम ।**

**हेमकटिबंधधर शक्रे**
**नामविनमित सामगान**
**प्रेम रविकुलसोम आम्हा रक्षि अनवरत ॥ ६ ॥**

। तामरसदलनयन भार्गवराम हलधरराम दशरथराम मेघश्याम सद्‌गुणधाम निस्सीम ॥ । हेमकटिबंधधर शक्रे नामविनमित सामगानप्रेम रविकुलसोम, आम्हा रक्षि अनवरत ॥ ६ ॥

**भावार्थ** हे दशरथपुत्र रामा, तुझे नेत्र कमलदलासारखे आहेत. भृगु कुळातील परशुराम तूच आहेस, नांगरधारी बलराम तूच आहेस आणि मेघांप्रमाणे सावळा श्यामही तूच आहेस. तू सद्‌गुणांचे धाम आहेस. तू निस्सीम, अनंत आहेस. तू सुवर्णमेखला धारण केली आहेस. इंद्र तुझ्या नामाला नमन करतो. सामगान तुला प्रिय आहे. तू सूर्यवंशातील चंद्र आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** तामरस म्हणजे कमळ.
परझुराम हाच भृगुकुळातील भार्गवराम होय.

**वेदगोचर वेणुनादवि**
**नोद मंदरशैलधर मधु**
**सूदनाच्युत कंसदानवरिपु महामहिम ।**
**यादवेंद्र यशोमतीसुत**
**नादबिंदुकलातिशय प्र**
**ल्हादरक्षक वरद आम्हा रक्षि अनवरत ॥ ७ ॥**

। वेदगोचर वेणुनादविनोद मंदरशैलधर मधुसूदनाच्युत कंसदानवरिपु महामहिम ॥ । यादवेंद्र यशोमतीसुत नादबिंदुकलातिशय प्रल्हादरक्षक वरद, आम्हा रक्षि अनवरत ॥ ७ ॥

**भावार्थ** वेदांमध्ये तूच दृश्यमान होतोस. नादमधुर बासरीच्या वादनाने तू सर्वांना आनंद देतोस. समुद्रमंथनाच्यावेळी तू कूर्मरूपात मंदार पर्वत आपल्या पाठीवर उचलून धरलास. हे अच्युता, उन्मत्त झालेल्या मधु दानवाचे तू प्राण घेतलेस. तू दुष्ट कंसाला यमसदनास पाठविलेस. तुझा महिमा महान आहे. हे यादवकुलसम्राटा, यशोदानंदना, नाद (ओंकार), बिंदु (पराशक्ति), कला (चैतन्य), या सर्वांच्या एकरूपतेतून निर्माण होणाऱ्या ब्रह्मानंदापेक्षाही तू श्रेष्ठ आहेस. तू भक्त प्रह्लादाचे रक्षण केलेस. हे वरदा, तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** अतिशय हा शब्द इथे 'त्याहून उत्कृष्ट' अशा अर्थाने घेतला आहे.

**अक्षयाश्रित सुजनजनसं**
**रक्षण श्रीवत्सकौस्तुभ**
**मोक्षदायक कुटिलदानवशिक्ष कुमुदाक्ष ।**
**पक्षिवाहन देवसंकुल**
**पक्ष निगमाध्यक्ष वरभा**
**लाक्षसख सर्वेश आम्हा रक्षि अनवरत** ॥ ८ ॥

। अक्षयाश्रित सुजनजनसंरक्षण श्रीवत्सकौस्तुभ मोक्षदायक कुटिलदानवशिक्ष कुमुदाक्ष ॥ । पक्षिवाहन देवसंकुलपक्ष निगमाध्यक्ष वरभालाक्षसख सर्वेश, आम्हा रक्षि अनवरत ॥८॥

**भावार्थ** तुला शरण आलेल्यांना तू अक्षय अभय देतोस. तू सुजनांचे संरक्षण करतोस. तुझ्या वक्षावर श्रीवत्स शुभचिन्ह आहे. तुझ्या गळयातील हारामध्ये समुद्रमंथनातून निघालेले कौस्तुभ रत्न आहे. तू मोक्षदाता आहेस. कुटिल दानवांना तू शिक्षा करतोस. तुझे लोचन श्वेतकमळासारखे सुंदर आहेत. गरूड पक्षी तुझे वाहन आहे. तू नेहमी देवांचा पक्ष घेतोस. तू वेदांचा स्वामी आहेस. भाळावर तृतीय नेत्र असलेल्या श्रेष्ठ शिवाचा तू सखा आहेस. हे सर्वेशा, तू आमचे अखंड रक्षण कर.

**चित्रकूट निवास विश्वा**
**मित्रक्रतुसंरक्ष रविशशि**
**नेत्र भव्यचरित्र सद्‌गुणगात्र सत्पात्र ।**
**धात्रिजांतक चतुरनाटक**
**सूत्र परमपवित्र फल्गुन**
**मित्र वाक्यविचित्र आम्हा रक्षि अनवरत ॥ ९ ॥**

। चित्रकूटनिवास विश्वामित्रक्रतुसंरक्ष रविशशिनेत्र भव्यचरित्र सद्‌गुणगात्र सत्पात्र ॥ । धात्रिजांतक चतुरनाटकसूत्र परमपवित्र फल्गुनमित्र वाक्यविचित्र, आम्हा रक्षि अनवरत ॥ ९ ॥

**भावार्थ** चित्रकूट पर्वतावर निवास असलेल्या विश्वामित्राच्या यज्ञाचे संरक्षण तू करतोस. तुझे नेत्र चंद्रसूर्याप्रमाणे तेजःपुंज तरी शीतल आहेत. तुझे चारित्र्य भव्य, तेजस्वी आहे. तुझ्या गात्रागात्रात सद्‌गुण भललेले आहेत. तू सदाचारी सद्‌गुणमूर्ती आहेस. भूपुत्र नरकासुराचा तू अंत केलास. तू या भवनाद्याचा धूर्त सूत्रधार आहेस. उत्तराफाल्गुनी नक्षत्रामध्ये जन्मलेल्या अर्जुनाचा तू मित्र आहेस. गीतेद्वारे विविध वैचित्र्यपूर्ण प्रकारे सत्य विशद करणाऱ्या परमपवित्रा, तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** क्रतु म्हणजे यज्ञ. नरकासुराला धात्रिज असे नाव वापरलेले आहे. गीतेमध्ये अर्जुनाला सत्यदर्शन घडविण्यासाठी कृष्णाने निरनिराळ्या प्रकारे तत्त्व समजवून सांगितलेले आहे. त्याकडे निर्देश करणाऱ्या वाक्यविचित्र या शब्दाने श्रीविष्णूचे वर्णन इथे केलेले आहे.

**मंगलात्मक दुरिततिमिरप**
**तंग गरुडतुरंग रिपुमद**
**भंग कीर्तितरंग पुरहरसंग नीलांग ।**

अंगदप्रियनंगपित का
लिंगमर्दन नयनकरुणा
थांग श्री नरसिंग आम्हा रक्षि अनवरत ॥ १० ॥

। मंगलात्मक दुरितनिमिरपतंग गरूडतुरंग रिपुमदभंग कीर्तितरंग पुरहरसंग नीलांग ॥ । अंगदप्रियनंगपित कालिंगमर्दन नयनकरुणाथांग, श्री नरसिंग, आम्हा रक्षि अनवरत ॥ १० ॥

**भावार्थ** हे मंगलमूर्ती, तू संकटांच्या अंधारामध्ये सूर्य होनोस. पक्षीराज गरूड हाच तुझा अश्व आहे. तू शत्रूंचे गर्वहरण करतोस. हे नीलश्यामलवर्णी, तू त्रिपुरासुरांच्या नगरांचा नाश करणाऱ्या पुरहराचा, शिवशंकराचा मित्र आहेस. रामावतारात तू वालीपुत्र प्रिय अंगदाचे रक्षण केलेस. तू अनंग मदनाचा पिता आहेस. तू कालियाचे मर्दन केलास. अथांग करुणामय नयनाने अनुग्रह करणाऱ्या हे नरसिंहा, तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** पतंग हा शब्द सूर्य या अर्थाने वापरला आहे. तुरंग म्हणजे घोडा.

दाशरथि वैकुंठनगरनि
वास त्रैजगदीश पापवि
नाश परमविलास हरि सर्वेश देवेश ।
वासुदेव दिनेशशतकप्र
काश यदुकुलवंशतिलक प
राशरे नत देव आम्हा रक्षि अनवरत ॥ ११ ॥

। दाशरथि वैकुंठनगरनिवास त्रैजगदीश पापविनाश परमविलास हरि सर्वेश देवेश ॥ । वासुदेव दिनेशशतकप्रकाश यदुकुलवंशतिलक पराशरे नत, देव आम्हा रक्षि अनवरत ॥ ११ ॥

**भावार्थ** हे दशरथपुत्रा, तुझा निवास वैकुंठामध्ये आहे. तू तीन्ही जगांचा स्वामी आहेस. तू सर्व पापांचा विनाश करतोस. तू

परमप्रकाशमान आहेस. हे हरी, तू सर्वांचा ईश्वर आहेस, तू देवांचा देव आहेस. हे वसुदेवपुत्रा, तू शंभर सूर्याइतका प्रकाशमान आहेस. तू यदुकुलाचा तिलक आहेस. पराशरऋषी तुझ्यापुढे नतमस्तक होतात. तू आमचे अखंड रक्षण कर.

**कुंदकलिकारदन परमा**
**नंद हरिगोऽविंद सनकस**
**नंदवंदित सिंधुबंधन मंदराद्रिधर ।**
**इंदिरापति विजयसख अर**
**विंदनाभ पुरंदरार्चित**
**नंदकंद मुकुंद, आम्हा रक्षि अनवरत ॥ १२ ॥**

। कुंदकलिकारदन परमानंद हरिगोविंद सनकसनंदवंदित सिंधुबंधन मंदराद्रिधर ॥ । इंदिरापति विजयसख अरविंदनाभ पुरंदरार्चित नंदकंद मुकुंद, आम्हा रक्षि अनवरत ॥ १२ ॥

**भावार्थ** तुझ्या दंतपंक्ति शुभकुंदकळ्यांसारख्या आहेत. हे हरि, हे गोविंद, तू परम आनंदाची मूर्ती आहेस. सनक आणि सनंद यासारखे ऋषी तुला वंदन करतात. रामावतारात तू सागरावर सेतू बांधलास. तू तुझ्या पाठीवर मंदार पर्वत तोललास. हे इंदिरापती, तू अर्जुनाचा सखा आहेस. तुझ्या नाभीतून कमळ फुलले आहे. ईंद्र तुझी पूजा करतो. हे नंदकुमारा, हे मुकुंदा, तू आमचे अखंड रक्षण कर.

**बाणबाहुच्छेद रावण**
**प्राणनाशन पुण्यनाम पु**
**राणपुरुषोत्तम निपुण अणुरेणु आकंठ ।**
**क्षोणिपति सुललित सुदर्शन**
**पाणि पांडवराजकार्यधु**
**रीण जगनिर्माण आम्हा रक्षि अनवरत ॥ १३ ॥**

। बाणबाहूच्छेद रावणप्राणनाशन पुण्यनाम पुराणपुरुषोत्तम निपुण अणुरेणु आकंठ ॥ । क्षोणिपति सुललित सुदर्शनपाणि पांडवराजकार्यधुरीण जगनिर्माण, आम्हा रक्षि अनवरत ॥ १३ ॥

**भावार्थ** तू बाणासुराचे बाहू छाटलेस, रावणाचे प्राणहरण केलेस. तुझे नाम पवित्र आहे. तू अनादि पुरुषोत्तम आहेस. तू सर्वकुशल आहेस. तुझ्या म्हणजेच या विश्वाच्या अणुरेणूमध्ये तू परिपूर्ण आहेस. तू पर्थ्वीचा राजा आहेस. तू मनमोहक आहेस. तू हाती सुदर्शनचक्र धारण केले आहेस. तू पांडवांच्या राजकार्याची धुरा समर्थपणे वाहिलीस. तू या विश्वाचा निर्माता आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**नीलवर्ण विशालशुभगुण**
**शील मुनिकुलतारिता वन**
**माल लक्ष्मीकांत रिपुशिशुपालशिरशूल ।**
**मूलकारण विमल यादव**
**जालहित गोपाल अगणित**
**लील कोमलकाय आम्हा रक्षि अनवरत ॥ १४ ॥**

। नीलवर्ण विशालशुभगुणशील मुनिकुलतारिता, वनमाल, लक्ष्मीकांत रिपुशिशुपालशीरशूल ॥ । मूलकारण विमल यादवजालहित गोपाल अगणितलील कोमलकाय, आम्हा रक्षि अनवरत ॥ १४ ॥

**भावार्थ** तुझा श्यामल वर्ण सुंदर आहे. अगणित शुभगुण तुझ्यामध्ये वास करतात. तू मुनिकुलांचे रक्षण करतोस. हे लक्ष्मीवल्लभा, शिशुपालासारख्या शत्रूला तू मस्तकशूळ दिलास, त्याचा शिरच्छेद केलास. तू वनपुष्पांची माला धारण केली आहेस. तू या विश्वातील सर्वांचे आदिकारण आहेस. तू पूर्णशुद्ध आहेस. तू यादवकुलाचा हितैषी आहेस. हे गोपाला, तुझ्या लीला अनंत आहेत. तुझी काया कोमल आहे. तू आमचे अखंड रक्षण कर.

**नागनगरीधरति कोशवि**
**भाग तंत्रनियोगगमन स**
**राग पांडवराजजितसंग्राम निस्सीम ।**
**योगगम्य भवाब्धि विषधर**
**नागगारुडमंत्रविद भव**
**रोगवैद्य विचित्र आम्हा रक्षि अनवरत ॥ १५ ॥**

। नागनगरीधरति कोशविभाग तंत्रनियोगगमन सराग, पांडवराजजितसंग्राम निस्सीम ॥ । योगगम्य भवाब्धि विषधरनागगारुडमंत्रविद भवरोगवैद्य विचित्र, आम्हा रक्षि अनवरत ॥१५॥

**भावार्थ** तू हस्तिनापुराच्या भूमिकोशाचे विभाजन करण्याचे तंत्र ठरविण्यासाठी पांडवांचा प्रतिनिधी म्हणून कौरवांकडे गेलास आणि आत्मीयतेने ते कार्य केलेस. धर्मराजासाठी, पांडवांसाठी तू कुशलतेने संग्रामात विजय प्राप्त करण्याचे कार्य केलेस. तुला कोणतीही सीमा नाही. तू योगाद्वारे आकलन होतोस. भवसागररूपी विषारी नागावर विजय मिळविण्यासाठी असलेल्या गारुडमंत्रात तू निष्णात आहेस. या जगताच्या सर्व व्याधींचा तू वैद्य आहेस. तू विविधगुणसंपन्न आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** सराग म्हणजे आत्मीयतेने, प्रेमाने, आपलेपणाने.
विचित्र हे विशेषण विष्णूचे गुणवैविध्य दर्शविते.

**श्रीमदुत्सुक देवनुत श्री**
**राम हा तव चरण सेवक**
**प्रेमभावे नमुनि साष्टांगे तुज विनवित ।**
**या महीवर असत अजुनि**
**क्षेम अवघे चरणकमल**
**क्षेम तुमचे कथुनि आम्हा रक्षि अनवरत ॥ १६ ॥**

। श्रीमदुत्सुक देवनुत श्रीराम, हा तव चरण सेवक प्रेमभावे नमुनि साष्टांगे तुज विनवित ॥ । या महीवर असत अजुनि क्षेम अवघे, चरणकमलक्षेम तुमचे कथुनि आम्हा रक्षि अनवरत ॥ १६ ॥

**भावार्थ** हे श्रीरामा, श्रीपतीच्या प्रसादास उत्सुक असलेले देव तुझी स्तुती करतात. हा तुझा नम्र सेवक तुला प्रेमभावे साष्टांग नमस्कार करून तुझी विनवणी करतो. या पृथ्वीवर आजवर आमचे सर्व काही क्षेमकुशल आहे. तुझ्या चरणकमलांचे क्षेमकुशल आम्हाला सांगून तू आमचे अखंड रक्षण कर.

**संग तव मर्यादि जे शर**
**णागतांच्या असति सेवे**
**लागि हर्षित धन्य ते जन हर महादेव ।**
**भोग भाग्यासक्ति मुक्ती**
**त्याग भजना विसर बोलू**
**रागलुब्धां काय आम्हा रक्षि अनवरत ॥ १७ ॥**

। संग तव मर्यादि जे शरणागतांच्या असति सेवेलागि हर्षित, धन्य ते जन हर महादेव ॥ । भोगभाग्यासक्ति, मुक्तीत्याग, भजना विसर, बोलू रागलुब्धां काय, आम्हा रक्षि अनवरत ॥ १७ ॥

**भावार्थ** हे हर महादेवा, आपल्या मर्यादित राहून जे तुझ्या सहवासात शरणागत भक्तांची मोठ्या आनंदाने सेवा करतात ते जन धन्य होत. ज्यांनी मुक्तिमार्गाचा त्याग केला आहे, जे भोगविलास व भाग्याने मिळालेल्या ऐहिक सुखाची आसक्ती धरतात, तुझे नामस्मरण, भजन यांचा ज्यांना विसर पडतो, अशा विषयलुब्ध लोकांविषयी काय बोलावे? तू आमचे अखंड रक्षण कर.

**भक्तिसाराचे कथन हरि**
**भक्तजनसुश्राव्य रचितो**
**युक्तलेखनपठन देई सिद्धि इष्टार्थ ।**
**मुक्तिदर्शन होत परिसा**
**भक्तजन तू तुष्ट जैसा**
**भक्तिने सुमनेचि आम्हा रक्षि अनवरत ॥ १८ ॥**

। भक्तिसाराचे कथन हरिभक्तजनसुश्राव्य रचितो, युक्तलेखनपठन देई सिद्धि इष्टार्थ ॥ । मुक्तिदर्शन होत, परिसा भक्तजन, तू तुष्ट जैसा भक्तिने सुमनेचि, आम्हा रक्षि अनवरत ॥ १८ ॥

**भावार्थ** हरिभक्तजनांना मी हरिभक्तिसाराचे सुश्राव्य असे कथन करितो. हे (विविध गुणांनी) युक्त लेखन आणि त्याचे पठन या दोहोंनी इष्टार्थ सिद्धी प्राप्त होते, मुक्तिप्राप्तीचा मार्ग खुला होतो. भक्तजन हो, याचे आपण निश्चित श्रवण करावे. उत्तम मनाने भक्ति केल्याने जसा तू प्रसन्न होतोस, तसे तू आमचे अखंड रक्षण कर.

**नलिनलोचनमूर्ति दीप्ती**
**झलक तव लहरींवरी भू**
**तलि नवलकारकचि नामामृतसमुद्रात ।**
**सुलिखितचि सत्कविजनांनी**
**वलय तव मी अज्ञ दे मं**
**गलकृपा सुज्ञांसि आम्हा रक्षि अनवरत ॥ १९ ॥**

। नलिनलोचनमूर्ति दीप्तीझलक तव लहरींवरी भूतलि नवलकारकचि नामामृतसमुद्रात ॥ । सुलिखितचि सत्कविजनांनी वलय तव, मी अज्ञ, दे मंगलकृपा सुज्ञांसि, आम्हा रक्षि अनवरत ॥ १९ ॥

**भावार्थ** हे कमलनयनमूर्ती, या भूतलावर तुझ्या नामामृतसागरातील तरंगातरंगावर तुझे चैतन्यतेज आश्चर्यकारकरीत्या झळाळत आहे.

थोर कविजनांनी तुझा महिमेच्या वलयाचे वर्णन केले आहे. मी तर अज्ञ आहे. सुजाण लोकांवर मंगल कृपा कर व तू आमचे अखंड रक्षण कर.

**बालशुक पाळूनि पंजरि**
**बोल ऐकति मधुर पढवुनि**
**लालने होती मुदित तैसे प्रभो मजसि ।**
**खोलुनी सांगा जिभेवर**
**बोलगुंजन नाम तव अन**
**मोल गाइन वरद आम्हा रक्षि अनवरत ॥ २० ॥**

। बालशुक पाळुनि पंजरि, बोल ऐकति मधुर पढवुनि लालने, होती मुदित तैसे प्रभो, मजसि ॥ । खोलुनी सांगा, जिभेवर बोलगुंजन नाम तव अनमोल गाइन वरद, आम्हा रक्षि अनवरत ॥ २० ॥

**भावार्थ** पोपटाच्या पिलाला पिंजऱ्यात पाळून, त्याचे लालनपालन करून, त्यास मधुर बोल शिकवून, ते प्रेमाने ऐकून जसे जन आनंदित होतात, तसे, हे प्रभू, मला जीवनार्थ उकलून समजावून सांग. हे वरद, माझी जीभ मग तुझ्या अनमोल नामाचे बोलगुंजन गाईल. आमचे अखंड रक्षण करा.

**सुगुण सुचरित सार्थ तव ना**
**मगुणगायन संभवे का**
**अगणितोपम गम्य त्वामितविक्रमे असशि ।**
**निगम गुण गात थकले पद**
**युगुल तव त्या नाढळे प**
**न्नगशयन सर्वेश आम्हा रक्षि अनवरत ॥ २१ ॥**

। सुगुण सुचरित सार्थ तव नामगुणगायन संभवे का? अगणितोपम, गम्य त्वामितविक्रमे असशि ॥ । निगम गुण गात थकले, पदयुगुल तव त्या नाढळे, पन्नगशयन सर्वेश, आम्हा रक्षि अनवरत ॥ २१ ॥

**भावार्थ** सद्‌गुणांनी भरलेल्या, चारित्र्यवान अशा तुझे यथार्थ नामगुणवर्णन करणे कोणाला तरी शक्य आहे का? अनंत, अतुलनीय असा तू केवळ असीमित कर्तृत्वानेच उमगतोस. वेद तुझे स्तुतिगान करून थकले, परंतु तुझे चरणयुगुल त्यांना गवसले नाहीत. हे शेषशायी सर्वेशा, तू आमचे अखंड रक्षण कर.

**वेदशास्त्रपुराणदर्शित**
**ना दिसत शुचिमार्ग गुरुवर**
**वादउक्ती मज न ठावे अज्ञ मी मूढ ।**
**आदिमूर्ती हे विपुल करु**
**णोदया हृदयांगणी ज्ञा**
**नोदयाशिष देइ आम्हा रक्षि अनवरत ॥ २२ ॥**

। वेदशास्त्रपुराणदर्शित ना दिसत शुचिमार्ग, गुरुवरवादउक्ती मज न ठावे, अज्ञ मी मूढ ॥ । आदिमूर्ती हे विपुल करुणोदया, हृदयांगणी ज्ञानोदयाशिष देइ, आम्हा रक्षि अनवरत ॥ २२ ॥

**भावार्थ** वेद, शास्त्र, पुराणांनी दाखविलेला शुद्धमार्ग पाहण्यास मी समर्थ नाही. गुरुजन व ज्येष्ठजन ज्याचे उच्चारण करतात अशी उत्तम युक्तिवादवचने मला माहीत नाहीत. मी बुद्धिहीन, मूढ आहे. ज्याची विपुल करूणा ओसंडून वाहत आहे असा तू आदिमूर्ती, आमच्या हृदयामध्ये ज्ञानोदय होईल असा आशिर्वाद देऊन तू आमचे अखंड रक्षण कर.

तनयभूक कळूनि झणि मा
य निमवी ती पाजुनि मुदित
स्तनरस तसे कोण तुजविण सकल पोषवित ।
भिनुन राहसि कोटि कोटि भु
वनि तुझ्या गर्भात वेदव
चनचि हे परमेश आम्हा रक्षि अनवरत ॥ २३ ॥

। तनयभूक कळूनि झणि माय निमवी ती पाजुनि मुदित स्तनरस, तसे कोण तुजविण सकल पोषवित ॥ । भिनुन राहसि कोटि कोटि भुवनि तुझ्या गर्भात, वेदवचनचि हे, परमेश, आम्हा रक्षि अनवरत ॥ २३ ॥

**भावार्थ** आपल्या उदरी जन्मलेल्या बाळाची भूक ओळखून माता जसे लगेच आपला स्तनरस पाजून ती आनंदाने शमविते, तसे सर्वांचे पोषण करणारा तुझ्याशिवाय कोण आहे, तू एकमेव आहेस. वेद म्हणतात की तू स्वतःच्या गर्भात कोटी कोटी ब्रह्मांडे सामावून ती व्यापून राहतोस. हे परमेशा, तू आमचे अखंड रक्षण कर.

पूत प्रिय तव दोन पहिला
सातदुगुणित लोकि कारण
भूत जीवा वृद्धिसाठी अन् दुजा पुत्र ।
प्राक्तना लेखी जिवांचे
ख्यात दोघे प्राणिजगतो
त्क्रांतिकारी तूचि आम्हा रक्षि अनवरत ॥ २४ ॥

। पूत प्रिय तव दोन, पहिला सातदुगुणित लोकि कारणभूत जीवा वृद्धिसाठी, अन् दुजा पुत्र ॥ । प्राक्तना लेखी जिवांचे, ख्यात दोघे, प्राणिजगतोत्क्रांतिकारी तूचि, आम्हा रक्षि अनवरत ॥ २४ ॥

**भावार्थ** तुम्हास दोन प्रिय पुत्र आहेत. त्यातील एक दोन्ही सप्तलोकांमध्ये जीवजगताची भरभराट होण्यासाठी कारणीभूत होतो. दुसरा पुत्र

जीवांचे भाग्य, त्यांच्या जीवनातील घटना यांची नोंद ठेवतो. दोघेही ख्यातकीर्त आहेत. सर्व प्राणिजगताची उत्क्रांती, भरभराट घडवून आणणारा मात्र तूच. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** मदन आणि ब्रह्म हे श्रीविष्णूचे दोन पुत्र मानले जातात. मदन सर्वांत पेमभावना निर्माण करून जीव निर्मीतीस साहाय्य करतो. विष्णूच्या नाभीतून आलेल्या कमळातून उत्पन्न झालेला ब्रह्म तर निर्मितीचा ईश्वर. तो सर्व जिवांचे प्राक्तन ठरवतो.

**हरि तव रमा पत्नि भगिनी**
**गिरिसुता सुत ब्रह्म सुर चा**
**कर तुझे शिव भाम ज्येष्ठा शारदा सून ।**
**निरत माया दासि निज मं**
**दिर जगत खलु जंगमस्था**
**वर कुटुंबी तुजसि आम्हा रक्षि अनवरत ॥ २५ ॥**

। हरि तव रमा पत्नि, भगिनी गिरिसुता, सुत ब्रह्म, सुर चाकर तुझे, शिव भाम, ज्येष्ठा शारदा सून ॥ । निरत माया दासि, निज मंदिर जगत खलु, जंगमस्थावर कुटुंबी तुजसि, आम्हा रक्षि अनवरत ॥ २५ ॥

**भावार्थ** हे हरि, लक्ष्मी तुझी सहचरी आहे, कमळातून उद्‌भवलेला ब्रह्म तुझा पुत्र, पार्वती तुझी बहीण, तर सरस्वती ही ज्येष्ठ सून आहेत. शंकर तुझा मेहुणा आहे. सर्व देवगण तुझे सेवक आहेत. माया तुझी दासी म्हणून व्यस्त आहे. संपूर्ण विश्व तुझे गृहमंदिर असून त्यात जे काही स्थावर, जंगम आहे ते तुझे कुटुंबीय आहेत. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** भाम म्हणजे बहिणीचा पती, मेहुणा. निरत म्हणजे कामात गुंतलेली, व्यस्त, व्यग्र.

सागरसुते चुकवुनी गम
नागमन करतोस तो उ
द्योग काय म्हणून निष्कारणचि जगतात ।
भागवतगणपरित्राणा
लागि तू संचारिसी भव
सागरि न बुडुदेत आम्हा रक्षि अनवरत ॥ २६ ॥

। सागरसुते चुकवुनी गमनागमन करतोस तो उद्योग काय म्हणून? निष्कारणचि, जगतात ॥ । भागवतगणपरित्राणालागि तू संचारिसी, भवसागरि न बुडुदेत, आम्हा रक्षि अनवरत ॥२६॥

**भावार्थ** श्री लक्ष्मीची तुझ्यावर घारीसारखी नजर असते. आणि तू तर लक्ष्मीच्या प्रेमात बांधलेला, एकनिष्ठ आहेस. तरीही तू त्या सागरकन्येच्या नकळत सर्वत्र सहज संचार करतोस हे कसे? निष्कारणच का? (हां, समजलो) या लोकी जे भक्तगण आहेत त्यांच्या रक्षणासाठी तू संचार करीत रहतोस. या भवसागरात बुडू न देता तू आमचे अखंड रक्षण कर.

हस्तिवाहन शक्र आणि स
मस्त देवगणांत कवण प्र
शस्त तुजसम रक्षि जो शरणागता सकल? ।
हस्त धरत सुदर्शना रिपु
मस्तका छेदी परात्पर
वस्तु तर तू असत आम्हा रक्षि अनवरत ॥ २७ ॥

। हस्तिवाहन शक्र आणि समस्त देवगणांत कवण प्रशस्त तुजसम रक्षि जो शरणागता सकल? ॥ । हस्त धरत सुदर्शना रिपु मस्तका छेदी परात्पर वस्तु तर तू असत, आम्हा रक्षि अनवरत ॥ २७ ॥

**भावार्थ** हत्ती ज्याचे वाहन आहे तो इंद्र आणि देवांचे समस्त समूह यामध्ये, सर्व शरणागतांचे रक्षण करण्यात तुझ्याइतका प्रशस्तीपात्र, सक्षम कोण आहे? हातात सुदर्शनचक्र धारण करून शत्रूंचे शिरच्छेद करणारा श्रेष्ठतम तर तू आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**अरिस दे वर दुजन जाणि न**
**परत घेण्यास परि सक्षम**
**वरद होई अन् निवारी कोण जगतात ।**
**सरसगुण कोण तुजसम को**
**ण रणि आव्हान तुज देउनि**
**हरवितो या जगति आम्हा रक्षि अनवरत ॥ २८ ॥**

। अरिस दे वर दुजन, जाणि न परत घेण्यास परि, सक्षम वरद होई अन् निवारी कोण? जगतात ॥ । सरसगुण कोण तुजसम, कोण रणि आव्हान तुज देउनि हरवितो या जगति, आम्हा रक्षि अनवरत ॥ २८ ॥

**भावार्थ** ब्रह्म आणि शिव हे दोघेजण शत्रूलाही वर देतात, परन्तु दिलेले वर मागे कसे घ्यायचे ते जाणत नाहीत. असा कोण आहे जो वर देण्यास आणि दुसऱ्या कोणी दिलेले वरदेखील निवारण्यास, परत घेण्यास, समर्थ आहे? तूच ना? या जगात तुझ्यासारखा सर्वोत्तम गुणधारी कोण आहे? युद्धात तुझ्यासमोर येण्याची अपेक्षा धरून तुझ्यावर विजय प्राप्त करेल असा कोण आहे? तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** ब्रह्म आणि शिव यांनी तपस्या करणाऱ्या दानवांना दिलेल्या वरांमुळे निर्माण झालेल्या समस्या विष्णूने सोडविल्याच्या अनेक कथा आहेत.

सुमनसांच्या कैक वैरी
कुमतिव्यक्ती करुनि तप शिव
कमलजपदा तोषवुन करतात प्राप्त वर ।
समरभूवर तुल्य जे वि
क्रम करिति वैऱ्यांसि त्या तू
अमरपद दिधलेसि, आम्हा रक्षि अनवरत ॥ २९ ॥

। सुमनसांच्या कैक वैरी कुमतिव्यक्ती करुनि तप शिवकमलजपदा तोषवुन करतात प्राप्त वर ॥ । समरभूवर तुल्य जे विक्रम करिति वैऱ्यांसि त्या तू अमरपद दिधलेसि, आम्हा रक्षि अनवरत ॥ २९ ॥

**भावार्थ** देवांशी वैरभाव धरणाऱ्या दुर्बुद्धी असलेल्या काहीजणांनी आपल्या तपाने शिव, तसेच ब्रह्म यांना प्रसन्न करून वर प्राप्ती करून घेतली आहे. परंतु, समरांगणावर तुझ्याशी तुल्यबळ पराक्रम करणाऱ्या वैऱ्यांनाही तू अमरपद, मोक्ष दिले आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** सुमनस म्हणजे चांगल्या मनाचे, देव

विनत कृष्णेस सदय चिरव
सन बलीस निबंधन पिळुन
स्तनविष हनन पूतनेचे स्पर्शुन शिलेस ।
बनविणे स्त्री त्रियसुराचे
हनन शील हरून स्त्रीचे
बनत उत्तम काम आम्हा रक्षि अनवरत ॥ ३० ॥

। विनत कृष्णेस सदय चिरवसन, बलीस निबंधन, पिळुन स्तनविष हनन पूतनेचे, स्पर्शुन शिलेस ॥ । बनविणे स्त्री, त्रियसुराचे हनन शील हरून स्त्रीचे, बनत उत्तम काम, आम्हा रक्षि अनवरत ॥ ३० ॥

**भावार्थ** भरसभेत वस्त्रहरण होत असता सती कृष्णेने तुला विनवणी केल्यावर तिला करुणामय होऊन असीमित वस्त्र पुरविलेस. देवांवर चिरकाल राज्य करण्याची शक्ती मिळविण्यासाठी यज्ञ करणाऱ्या बळिराजाला तू जमिनीत गाडून बंधनात टाकलेस. तुला स्तनपानातून विष देऊ इच्छिणाऱ्या पूतनेचा तिचे विष पिळून काढून तू प्राणनाश केलास. इंद्राबरोबरच्या व्यभिचाराच्या कृत्यामुळे मिळालेल्या पती गौतमऋषींच्या शापाने शिला बनलेल्या अहिल्येचा तुझ्या पदस्पर्शाने स्त्रीरूपात पालट करून तिला मुक्ती दिलीस. त्रिपुरासुरांना पराभूत करण्यासाठी त्यांना अधर्मप्रवृत्त करण्याच्या योजनेत त्याच्या स्त्रियांचा तू शीलव्रतभंग केलास. उत्तम काम करून जगकल्याण साधलेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** ब्रह्माकडून वर प्राप्त करून घेऊन उन्मत्त झालेल्या त्रिपुरासुर दानवाच्या श्रीविष्णूने केलेल्या वधाच्या अनेक आख्यायिका आहेत. एका आख्यायिकेनुसार त्रिपुरासुराची शक्ती त्याच्या स्त्रियांच्या पातिव्रत्यामध्ये होती. म्हणून श्रीविष्णूने युक्तीने त्यांचे शीलहरण करून त्याची शक्ती नष्ट केली. कनकोपनिषदातही याचा उल्लेख आहे.

**मरण मकरा रक्षिण्या गज**
**चिरुनि भंग हिरण्यकश्यपु**
**शिर शिशूचे सुरक्षण शकटासुरा मरण ।**
**मरण कंसखलाप्रती मद**
**हरण वत्सा भंग मगधिय**
**खरहनन खलदमन आम्हा रक्षि अनवरत ॥ ३१ ॥**

। मरण मकरा रक्षिण्या गज चिरुनि भंग हिरण्यकश्यपु शिर शिशूचे सुरक्षण, शकटासुरा मरण ॥ । मरण कंसखलाप्रती, मदहरण वत्सा, भंग मगधिय, खरहनन, खलदमन, आम्हा रक्षि अनवरत ॥ ३१ ॥

**भावार्थ** त्रिकूट पर्वतावरील वनात गजेंद्राचे रक्षण करण्यासाठी तू सरोवरातील मगरीला मारलेस. नरसिंहरूपात तू हिरण्यकश्यपूला दुभंगलेस आणि प्रह्लादबाळाच्या मस्तकाचे रक्षण केलेस. शकटाच्या रूपातील राक्षसाचा, शकटासुराचा तू वध केलास, दुष्ट कंसाला मत्यृ दिलास, वत्साचे गर्वहरण केलेस, मगधनरेश शिशुपालाचे शिर दुभंगलेस, रावणाचा सावत्र भाऊ खर याची हत्या केलीस. सर्व दुष्ट शक्तींना तू शमविलेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** मगधीय म्हणजे मगधनरेश.

**असुरहनन करून बाल्या**
**त सबल करिसि त्यक्त तारु**
**ण्यसमयी चक्रास निर्देशून पंडुसुत ।**
**वसुमति भरक्षर करुनि सा**
**हस मुदितभावात तुष्ट क**
**रिसि तिन्ही लोकांस आम्हा रक्षि अनवरत ॥ ३२ ॥**

। असुरहनन करून बाल्यात सबल, करिसि त्यक्त तारुण्यसमयी चक्रास, निर्देशून पंडुसुत ॥ । वसुमति भरक्षर, करुनि साहस मुदितभावात तुष्ट करिसि तिन्ही लोकांस, आम्हा रक्षि अनवरत ॥ ३२ ॥

**भावार्थ** आपल्या बालपणातच तू बळाने असुरांचे हनन केलेस. मग यौवनकाळात सुदर्शनचक्राचा त्याग केलास. पांडवांना मार्गदर्शन करून तू या पथ्वीचा भार हलका केलास आणि या साहसाने आनंदित होऊन तू त्रैलोक्याला संतुष्ट केलेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**सकल लोक तुझा निवास हि**
**तकर देवगणास तूच य**
**दुकुल बंधुत्वी तुजसि दैत्यांसि तुज वैर ।**
**सकल कुरुकुल पांडवे न**
**ष्ट करिसी ज्ञानी म्हणुनि नम**
**न करतो तुज देव आम्हा रक्षि अनवरत ॥ ३३ ॥**

। सकल लोक तुझा निवास, हितकर देवगणास तूच, यदुकुल बंधुत्वी तुजसि, दैत्यांसि तुज वैर ॥ । सकल कुरुकुल पांडवे नष्ट करिसी ज्ञानी म्हणुनि नमन करतो तुज देव, आम्हा रक्षि अनवरत ॥ ३३ ॥

**भावार्थ** तू सर्वांमध्ये वास करतोस. देवगणांसाठी तू हितकारी आहेस. सर्व यादवकुळाशी तुझा बंधुभाव आहे. दानवांशी तू वैरत्व धरतोस. पांडवांहस्ते तू संपूर्ण कौरवकुळाला नष्ट केलेस. देवा, असा विविध गणांशी उचित असे वर्तन करणाऱ्या तुला ज्ञानी म्हणून नमन करतो. तू आमचे अखंड रक्षण कर.

**करुनि अर्जुन रथनियंत्रण**
**तुरग तृष्णा शमविण्या रणि**
**शररचित जलकुंड सैंधवमस्तक उडवुन ।**
**किरिटबाणे पतन पितया**
**करतळी त्याच्याचि हर हर**
**परमसाहसि असशि आम्हा रक्षि अनवरत ॥ ३४ ॥**

। करुनि अर्जुन रथनियंत्रण तुरग तृष्णा शमविण्या रणि शररचित जलकुंड, सैंधवमस्तक उडवुन ॥ । किरिटबाणे पतन पितया करतळी त्याच्याचि, हर हर, परमसाहसि असशि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ३४ ॥

**भावार्थ** अर्जुनाच्या रथाचा सारथी बनून रथाच्या घोड्यांची तहान भागविण्यासाठी तू धरतीमधून सरोवराची रचना केलीस.

अर्जुनाच्या बाणाने तू सैंधवाचे मस्तक उडवून त्याच्याच पित्याच्या हातात पाडलेस. हर हर, तू परमसाहसी आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** अभिमन्यूच्या हत्येचा प्रतिशोध घेण्यासाठी अर्जुनाच्या बाणाने सैंधवाचे, म्हणजे जयद्रथाचे, डोके असे उडविले की ते उडून जयद्रथाच्या पित्याच्याच ओंजळीत पडले व तिथून खाली पडून जयद्रथाला शंकराकडून मिळालेल्या वरानुसारच त्या मस्तकाची शकले झाली. या महाभारत युद्धातील कथेचा यास संदर्भ आहे.

**समरि तुमच्यावरचि रोषा**
**क्रमण करुनी श्रुतायुथ उ**
**त्तम लढे निंदून हो पण स्वायुधे स्वहत ।**
**न मजसि चमत्कार कसला**
**उमजत कशी गुह्य माया**
**तुमचि जाण तुम्हांस आम्हा रक्षि अनवरत ॥ ३५ ॥**

। समरि तुमच्यावरचि रोषाक्रमण करुनी श्रुतायुध उत्तम लढे निंदून, हो पण स्वायुधे स्वहत ॥ । न मजसि चमत्कार कसला उमजत, कशी गुह्य माया तुमचि जाण तुम्हांस, आम्हा रक्षि अनवरत ॥ ३५ ॥

**भावार्थ** युद्धात क्रोधायमान होऊन श्रुतायुधाने तुमची निंदा करून तुमच्यावरच उत्तम, प्रखर आक्रमण केले, पण स्वतःच्या आयुधाने स्वतःचाच मृत्यू ओढवून घेतला. हा चमत्कार नेमका कसा घडला ते मला उमजत नाही. तुमच्या त्या मायेचे गुपित, मर्म तुम्हालाच ठाऊक. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** भीष्मपर्वातील या कथेनुसार वरुणदेव व परष्णा नदी यांचा पुत्र श्रुतायुध याची अतिशक्तिमान गदा तो ज्याच्या रोखाने फेकेल त्याचा मृत्यू निश्चित होता. मात्र ती व्यक्ती शस्त्रहीन असता कामा

नये अशी त्यास अट होती. महाभारत युद्धाच्या १४ व्या दिवशी श्रुतायुध अर्जुन व कृष्णाच्या समोर आला. अतिरागाने कृष्णाची नालस्ती करून त्याने त्याची गदा कृष्णाच्या दिशेने फेकली. कृष्ण शस्त्रहीन असल्याने ती गदा उलट फिरली व तिने श्रुतायुधाचाच बळी घेतला.

**अवनिपति असुनी सकळ या**
**दवकुळासी मानिसी आ**
**प्त वध घडवुनि बंधुपुत्राचा रणी करिसि ।**
**तव भगिनि सानास शोका**
**र्णवगत करुनि त्रस्त कुलबां**
**धवि तरी तू कीर्त आम्हा रक्षि अनवरत ॥ ३६ ॥**

। अवनिपति असुनी सकळ यादवकुळासी मानिसी आप्त, वध घडवुनि बंधुपुत्राचा रणी करिसि ॥ । तव भगिनि सानास शोकार्णवगत करुनि त्रस्त, कुलबांधवि तरी तू कीर्त, आम्हा रक्षि अनवरत ॥ ३६ ॥

**भावार्थ** तू संपूर्ण धरतीचा स्वामी असूनही सकल यादवकुळाप्रती बंधुभाव ठेवलास. अभिमन्यू तुझा बंधुपुत्र. परन्तु युद्धात त्याचा मृत्यू घडवून आणलास आणि स्वतःच्या धाकट्या वहिणीस दुःखसागरात बुडवून कष्ट दिलेस. तरीही त्या कुलबांधवात तुला कीर्ती प्राप्त झाली. तू अगाध आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** कंसाचा बध करीत असताना कंसाने कृष्णाला असा शाप दिला होता की कृष्णालाही तसाच मृत्यू येईल. आपल्याला आपल्या भाच्यांपासून धोका असल्याचे कृष्णाने ध्यानात घेतले. त्यामुळे चक्रव्यूह भेदण्याची कला विशद करीत असताना सुभद्रेला झोप लागल्यावर, ते ऐकत असलेले तिच्या पोटातील बालक हे भाचा

असल्यामुळे, चक्रव्यूहातून बाहेर पडण्याचे रहस्य कृष्णाने मुद्दामहून सांगितले नाही, अशी एक आख्यायिका आहे.

**माय विलग सुता करुनि रा**
**धेयकर्णी गुह्यवृत्त कु**
**लीय विस्तृत विशद पार्थाकरवि करिसि हत ।**
**न्याय की अन्याय तव मा**
**या युगतगुण गुह्य इंगित**
**काय जाणिसि तूचि आम्हा रक्षि अनवरत ॥ ३७ ॥**

। माय विलग सुता, करुनि राधेयकर्णी गुह्यवृत्त कुलीय विस्तृत विशद, पार्थाकरवि करिसि हत ॥ । न्याय की अन्याय तव माया युगतगुण गुह्य इंगित काय जाणिसि तूचि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ३७ ॥

**भावार्थ** आईपासून विभक्त झालेल्या पुत्र राधेयाच्या कानात तू त्याच्या कुळाचे गुपित सविस्तारपणे उघड करून, पार्थाकरवी त्याची हत्या घडवून आणलीस. हा न्याय की अन्याय? तुझ्या मायेच्या गूढ युक्तिगुणांचे इंगित तूच जाणतोस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**हनन ज्या करणे मनोगत**
**बनविणे स्नेही तयाला**
**अनुचित कवण जाणि तवगुण पण यदुकुलात ।**
**बनसि गोपीचेतना तू**
**मनन करुनी कळत लोकी**
**जन सम सकल तुजसि आम्हा रक्षि अनवरत ॥ ३८ ॥**

। हनन ज्या करणे मनोगत, बनविणे स्नेही तयाला अनुचित, कवण जाणि तवगुण, पण यदुकुलात ॥ । बनसि गोपीचेतना तू, मनन करुनी कळत लोकी जन सम सकल तुजसि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ३८ ॥

**भावार्थ** ज्याचा वध करावयाचे मनात आहे त्याच्याशी मैत्री करणे अनुचित आहे. पण ते तू केलेस. तुझे नेमके गुण समजणारा आहे तरी कोण? पण, यदुकुळात गोपींना चेतना देणारा प्रेरकही तूच आहेस, असा विचार करता उमजते, की या लोकात सर्व जन तुला सारखेच आहेत. तू आमचे अखंड रक्षण कर.

**मरण स्वसुता बंदि रमणी**
**करत जो षोडश सहस्र म**
**धुर तया तू मोहपाशी बनुनि विटपुरुष ।**
**करनखलिखित तीक्ष्ण अन् विवि**
**ध रतिकामी हर्षित चरा**
**चरि पवित्र तरीहि आम्हा रक्षि अनवरत ॥ ३९ ॥**

। मरण स्वसुता बंदि रमणी करत जो षोडश सहस्र, मधुर तया तू मोहपाशी बनुनि विटपुरुष ॥ । करनखलिखित तीक्ष्ण अन विविध रतिकामी हर्षित, चराचरि पवित्र तरीहि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ३९ ॥

**भावार्थ** सोळा हजार सुंदर स्त्रियांना बंदी बनविणाऱ्या स्वतःच्या पुत्राला तू मरण दिलेस आणि त्या स्त्रियांच्या मधुर पाशात तू जारपुरुष बनलास, तीक्ष्ण नखांनी त्यांच्या तनूवर नक्षी काढण्यात आणि त्यांच्याशी केलेल्या विविध रतिकलांत तू हर्षभरित झालास. तरीही या जगतात तू पवित्रच राहिलास. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** नरकासुर हा विष्णू व भूदेवी यांचा वराह अवतारातील पुत्र असल्याची आख्यायिका आहे. त्याने सोळा सहस्र स्त्रियांना बंदिवासी बनविले. त्याच्या वधानंतर त्या स्त्रियांनी याचना केल्यावरून कृष्णाने त्यांच्याशी विवाह केल्याचे पुराणे सांगतात.

काय फल कवण कर्माचे
ना यश तया तव कृपेविण
काय संशय यात कीटकमधुपन्यायात ।
व्हायला नग विघ्न गवता
काय जर तू हो सदय मग
काय चिंता उरत आम्हा रक्षि अनवरत ॥ ४० ॥

। काय फल कवण कर्माचे, ना यश तया तव कृपेविण काय संशय यात, कीटकमधुपन्यायात ॥ । व्हायला नग विघ्न गवता काय जर तू हो सदय, मग काय चिंता उरत? आम्हा रक्षि अनवरत ॥ ४० ॥

**भावार्थ** कोणते कर्म केल्यावर काय फळ मिळते? तुझ्या कृपेशिवाय कोणत्याही कर्माला यश मिळत नाही यात काय शंका? भ्रमर-कीटक न्यायाने, तू प्रसन्न असल्यावर गवताचाही पर्वत बनण्यात काही विघ्न येत नाही. मग आम्हास तरी कसली चिंता? तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** काहींची श्रद्धा असते की भ्रमर काही कीटकांना त्याच्या घरट्यात आणून त्याभोवती गुंजन करीत घिरट्या घालतो. आणि सतत गुंजन ऐकून कीटकाचाच भ्रमर बनतो. त्याप्रमाणे अंगी काही क्षमता नसताना ईश्वरकृपेने कनकदास स्वतः काही कार्य करू शकले असे यातून सूचित केले असावे.

कितिहि केले यत्न तरि ला
भत जसे भाग्यात बोलत
मतिविचल जन बोलु दे ते विसरुया बोल ।
स्थित नृपपदी ध्रुव कसा खे
ळ तव इच्छित बंधु काय चु
कत वर कुचेलासि आम्हा रक्षि अनवरत ॥ ४१ ॥

। कितिहि केले यत्न तरि लाभत जसे भाग्यात, बोलत मतिविचल जन, बोलु दे, ते विसरुया बोल ॥ । स्थित नृपपदी ध्रुव कसा खेळ तव, इच्छित बंधु, काय चुकत वर कुचेलासि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ४१ ॥

**भावार्थ** ज्यांची मती भ्रमित झाली आहे असे लोक म्हणतात की कितीही प्रयत्न केले तरी भाग्यात जसे असेल तसेच लाभते. म्हणू देत, आपण ते विसरून जाऊ. कारण सर्व काही तूच तर करतोस. ध्रुव राजपदावर कसा बसला? ती तुझीच तर लीला. हे इष्ट बंधू, तू केलेल्या वराचा लाभ कुचेलाला मिळायचा चुकला का? तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** कुचेल म्हणजे सुदामा.

**वन्य चरितार्थास वधिले**
**अन्य जन रानी परन्तु अ**
**नन्य तव नाम जपिता खलु वाल्मिकी होत ।**
**धन्य गणला मुनिकुली सं**
**पन्न होई कोण पापवि**
**पन्न जर तू तुष्ट आम्हा रक्षि अनवरत ॥ ४२ ॥**

। वन्य चरितार्थास वधिले अन्य जन रानी, परन्तु अनन्य तव नाम जपिता, खलु वाल्मिकी होत ॥ । धन्य, गणला मुनिकुली संपन्न, होई कोण पापविपन्न जर तू तुष्ट! आम्हा रक्षि अनवरत ॥ ४२ ॥

**भावार्थ** वनात उदरनिर्वाहासाठी अन्य जनांना ठार मारणारा वाल्मिकी. परन्तु, नारदाने उपदेश केल्यावर तुझ्या अनन्य अशा नामाचा जप करताच तो खरोखर धन्य झाला, मुनिकुलात संपन्न, श्रेष्ठ गणला गेला. तू संतुष्ट असल्यावर कोणी पापग्रस्त होईल का? तू आमचे अखंड रक्षण कर.

हीनमति तव पलिप्रति दु
ष्टानुजासी अभय देसि म्ह
णूनि करुणामूर्ति म्हणविसि हे क्षमावंत ।
जे नराधिप करिति तव गुण
गान इहपर प्राप्त सुख सं
पन्न सद्गुणहीर आम्हा रक्षि अनवरत ॥ ४३ ॥

। हीनमति तव पलिप्रति दुष्टानुजासी अभय देसि म्हणूनि करुणामूर्ति म्हणविसि, हे क्षमावंत ॥ । जे नराधिप करिति तव गुणगान, इहपर प्राप्त सुख, संपन्न सद्गुणहीर, आम्हा रक्षि अनवरत ॥ ४३ ॥

**भावार्थ** तुझ्या पत्नीकडे ज्याने हीन बुद्धीने पाहिले त्या दुष्ट रावणाच्या धाकट्या भावाला, बिभीषणाला तू क्षमा केलीस म्हणून तू करुणामूर्ति मानला जातोस. यास्तव ज्या सार्वभौम राजांनी तुझे गुण गाइले, त्यांना इहलोकी व परलोकीही सुखशांती मिळाली. तू वैभवसंपन्न व सद्गुणांचा हिरा आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

वीर दशवदनाशि लढले
वीर कपिवर धन्य त्यातचि
मारुतसुत तयास देऊ करिसि ब्रह्मपद ।
हे रमापति कोण असत उ
दार तुजसम त्रिभुवनी या
कारणे विश्वसत आम्हा रक्षि अनवरत ॥ ४४ ॥

। वीर दशवदनाशि लढले वीर कपिवर, धन्य त्यातचि मारुतसुत, तयास देऊ करिसि ब्रह्मपद ॥ । हे, रमापति कोण असत उदार तुजसम त्रिभुवनी? या कारणे विश्वसत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ४४ ॥

**भावार्थ** वीर दशानना बरोबर लढलेल्या वीर कपिवरांमध्ये जो मारुतसुत हनुमान, तो किती धन्य झाला! त्याला तू ब्रह्मपद देऊ केलेस!

हे रमापती, तुझ्यासारखा उदार तीन्ही लोकात दुसरा कोण आहे? म्हणूनच आम्ही तुझ्यावर पूर्ण विश्वसतो. तू आमचे अखंड रक्षण कर.

**शिव शिव अनुग्रह तुझा को**
**ण विसरि अजामिळ खला प्रा**
**णविलयी यमदूत ये परि बोलता नाम ।**
**तव सुपूर्त न जीव हो मा**
**धव सुरक्षी त्यास तुजसम**
**कवण करुणावंत आम्हा रक्षि अनवरत ॥ ४५ ॥**

। शिव शिव, अनुग्रह तुझा कोण विसरि अजामिळ खला प्राणविलयी यमदूत ये, परि बोलता नाम ॥ । तव सुपूर्त न जीव हो, माधव सुरक्षी त्यास, तुजसम कवण करुणावंत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ४५ ॥

**भावार्थ** शिव, शिव, तुझे उपकार, तुझा अनुग्रह कोण विसरेल? पापी अजामिळाचे प्राणहरण करण्यास यमदूत आले. पण मृत्युसमयी आपल्या पुत्राला हाक मारण्यासाठी 'नारायण' असा तुझा नामोच्चार करताच तू त्याच्यावर दयावंत झालास. यमदूतांकडे त्याचा जीव सुपूर्त न करता, हे माधवा, तू त्याचे रक्षण केलेस. तुझ्यासारखा दयावंत दुसरा कोण आहे? तू आमचे अखंड रक्षण कर.

**स्वतनयेसि विवाह करि सर**
**स तुज तो गुरुपत्निशीच कु**
**मति जया मनज श्वशुररिपु पत्निचा बंधु ।**
**रति मुनिस्त्रीसि करण्या का**
**ढत समय घे रतिसुख पण मि**
**ळत तया कैवल्य आम्हा रक्षि अनवरत ॥ ४६ ॥**

। स्वतनयेसि विवाह करि सरस तुज तो, गुरुपत्निशीच कुमति जया मनज, श्वशुररिपु पत्निचा बंधु ॥ । रति मुनिस्त्रीसि करण्या काढत समय, घे रतिसुख, पण मिळत तया कैवल्य, आम्हा रक्षि अनवरत ॥ ४६ ॥

**भावार्थ** ज्याने स्वतःच्या कन्येबरोबर विवाह केला त्या ब्रह्माला तू उत्तम मानतोस. गुरुपत्नीकडे वाईट दृष्टीने पाहणारा चंद्र तुझा मानसपुत्र आहे. श्वशुराबरोबर शत्रुत्व धरणारा अर्जुन तुझा मेव्हणा आहे. मुनिपत्नीशी कामेच्छा ठेवून, त्या साठी वाट पाहत वेळ काढून तिच्याशी समागम करणाऱ्याला इंद्राला तू कैवल्यपद दिलेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** अनेक पुराणकथांवर आधारलेली ही षट्पदी काहीशी उपहासात्मक आहे. ब्रह्मदेवाच्या मनातून सरस्वती उत्पन्न झाली व त्याने तिच्याशीच विवाह केला. विष्णूच्या मनातून उत्पन्न झालेल्या चंद्राने देवगुरू बृहस्पतीच्या पत्नीवर वाईट नजर ठेवली. आपला सासरा द्रुपद, त्याचा सरळ युद्धात पराभव करून अर्जुन त्याला गुरू द्रोणाचार्यांकडे घेऊन आला. अर्थात ही द्रौपदीशी विवाह होण्यापूर्वीची गोष्ट. गौतम ऋषी बाहेर जाण्याची वाट पाहून इंद्राने ऋषिपत्नीशी समागम केला व त्याबद्दल त्या दोघांनाही गौतमऋषींकडून शाप मिळाला. या कथांचा आधार या षट्पदीला आहे.

असशि तू इकडे नि तिकडे
नसशि वच अनुचित तुजविना
वसत अंतर्बाह्य न दुजा सूज्ञ आकलत ।
वसुमतीवर भागवत ज्या
नसति वंद्य तयास सद्गति
असत खलु अप्राप्य आम्हा रक्षि अनवरत ॥ ४७ ॥

। असशि तू इकडे नि तिकडे नसशि, वच अनुचित, तुजविना वसत अंतर्बाह्य न दुजा, सूज्ञ आकलत ॥ । वसुमतीवर भागवत ज्या नसति वंद्य, तयास सद्‌गति असत खलु अप्राप्य, आम्हा रक्षि अनवरत ॥ ४७ ॥

**भावार्थ** तू इथे आहेस, तिथे नाहीस अशा प्रकारचे बोलणे अयोग्य आहे. आत, बाहेर, सर्वत्र तुझ्याशिवाय दुसरा कोणीच नाही हे सूज्ञ, ज्ञानी लोक तू जाणतात. या पृथ्वीवरील भगवद्‌भक्त ज्यांना वंद्य नाहीत, त्यांना खरेच सद्‌गती अप्राप्य आहे. तू आमचे अखंड रक्षण कर.

**निरत धनसमृद्धि मधि तू**
**करिसि दीनांना परोक्ष अ**
**करुण बनसी काय तू रमलासि गर्वात ।**
**हर हर तुज अनाथरक्षक**
**वरद आम्ही समजतो की**
**बिरुद ते त्यजिलेस आम्हा रक्षि अनवरत ॥ ४८ ॥**

। निरत धनसमृद्धि मधि तू करिसि दीनांना परोक्ष, अकरुण बनसी, काय तू रमलासि गर्वात? ॥ । हर हर, तुज अनाथरक्षक वरद आम्ही समजतो, की बिरुद ते त्यजिलेस? आम्हा रक्षि अनवरत ॥ ४८ ॥

**भावार्थ** धनसमृद्धीमध्ये रममाण होऊन तू निर्दय बनून दीनांकडे दुर्लक्ष करातोस. तू गर्वात मग्न झालास काय? हर हर! आम्ही तुला अनाथांचा रक्षक, वरदाता समजतो. त्या बिरुदाचा तू त्याग तर केला नाहीस? तू आमचे अखंड रक्षण कर.

**दीन मी तू सर्वलोकी**
**दानि असशि विचारण्या मति**
**हीन मीचि महामहिम कैवल्यपति तुजसि ।**

सानमति मी साच तू सु
ज्ञानमूर्ती कोण तुजसि स
मान देवा तूचि आम्हा रक्षि अनवरत ॥ ४९ ॥

। दीन मी, तू सर्वलोकी दानि असशि, विचारण्या मतिहीन मीचि महामहिम कैवल्यपति तुजसि ॥ । सानमति मी, साच तू सुज्ञानमूर्ती, कोण तुजसि समान, देवा तूचि आम्हा रक्षि अनवरत ॥ ४९ ॥

**भावार्थ** मी दीन आहे. तू सर्वलोकात दानी आहेस. हे महामहीम कैवल्यपती, तुला ज्ञानमार्ग विचारण्याइतकीही मती माझ्याकडे नाही. मी अल्पमती आहे. तू खरा ज्ञानमूर्ती. तुझ्यासारखा कोण आहे? देवा, तू अखंड आमचे रक्षण कर.

तरल बालपणात राहुन
तरुणकाळी दंग मदयुत
चरणि तव ना लीन मी होत विषयसुखरत ।
नरकपात्र बनूनि कामा
तुर परस्त्री परधनेच्छू
हरण कर पापासि आम्हा रक्षि अनवरत ॥ ५० ॥

। तरल बालपणात राहुन, तरुणकाळी दंग मदयुत, चरणि तव ना लीन मी होत, विषयसुखरत ॥ । नरकपात्र, बनूनि कामातुर परस्त्री परधनेच्छू, हरण कर पापासि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ५० ॥

**भावार्थ** बालपणी चंचल आणि तरुणपणी मदमस्तीत दंग राहिल्याने मी तुझ्या चरणी लीन होऊन तुला वंदन केले नाही. विषयसुखात रममाण होऊन मी नरकात जाण्याच्या पात्रतेचा बनलो. कामातुर बनून परस्त्री व परधनाची इच्छा मनी बाळगली. माझ्यावर दया कर, मला सर्व पापांतून मुक्त कर. तू आमचे अखंड रक्षण कर.

**विसरलो तुज उन्नतीत न**
**विसरि आपत्तिसमयात तु**
**जसि विनवितो रक्षि मज चंचलमन पद तव ।**
**विसरुनी जो भटकला त्या**
**विसरशी का गो न वत्सा**
**विसरि ममता धरुनि आम्हा रक्षि अनवरत ॥ ५१ ॥**

। विसरलो तुज उन्नतीत, न विसरि आपत्तिसमयात, तुजसि विनवितो रक्षि मज चंचलमन, पद तव ॥ । विसरुनी जो भटकला त्या विसरशी का? गो न वत्सा विसरि, ममता धरुनि आम्हा रक्षि अनवरत ॥ ५१ ॥

**भावार्थ** मी तुला माझ्या उत्कर्ष काळात विसरलो, परंतु आपत्तिकाळात विसरत नाही. माझे मन चंचल आहे, तू माझे रक्षण कर अशी तुला विनवणी करतो. तुझ्या चरणाचे विस्मरण होऊन जो भटकला त्यालाही तू कसा विसरशील? गाय कधी आपल्या पिलाला विसरेल का? ममतेने तू आमचे रक्षण कर.

**अवनिवर षट्चक्रवर्ती**
**अवतरत ते षोडश नृपा**
**लवर आधी नृप किती राज्य करिती जाणि ।**
**कवण प्रिय ते वीर का हो**
**अवनिनारिस मोहवुन ती**
**तव करित सेवाचि आम्हा रक्षि अनवरत ॥ ५२ ॥**

। अवनिवर षट्चक्रवर्ती अवतरत, ते षोडश नृपालवर, आधी नृप किती राज्य करिती जाणि ॥ । कवण, प्रिय ते वीर का हो अवनिनारिस? मोहवुन ती तव करित सेवाचि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ५२ ॥

**भावार्थ** या धरतीवर सहा चक्रवर्ती आणि सोळा श्रेष्ठ नृपाल झाले, तर आधी किती राजांनी राज्य केले कोणाला समजते? ते सर्व वीर

धरतीनारीला प्रिय आहेत का? ती धरती तुला मोहवून तुझीच नर सेवा करते. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** नळ, हरिश्चंद्र, पुरुकुत्स, पुरुरवा, सागर आणि कार्तवीर्य, हे सहा चक्रवर्ती होत.

मरुत्त, सुहोत्र, अंग, शिबी, भरत, श्रीराम, भगीरथ, दिलीप, मांधात, ययाती, गाय, रंतिदेव, सागर, शरबिंदु, अम्बरीश आणि प्रभू, हे सोळा श्रेष्ठ नृप होत. यात संदर्भ असलेली अवनिनारी, भूदेवी ही विष्णुपत्नी आहे.

**धरिसि या संसारभारा**
**करिति गुणगान निगम निरं**
**तर तव तिन्ही देवमानवनागलोकात ।**
**ठरत कोण स्वतंत्र मुक्ती**
**वरद तुजसम कोण तू सद्**
**गुरुचि जगदध्यक्ष आम्हा रक्षि अनवरत ॥ ५३ ॥**

। धरिसि या संसारभारा करिति गुणगान निगम निरंतर तव, तिन्ही देवमानवनागलोकात ॥ । ठरत कोण स्वतंत्र, मुक्तीवरद तुजसम कोण, तू सद्गुरुचि जगदध्यक्ष, आम्हा रक्षि अनवरत ॥ ५३ ॥

**भावार्थ** या जगताचा मोठा संसारी भार तूच धारण करतोस, असे सर्व वेद नेहमी तुझे गुणगान करतात. देवलोक, मानवलोक, नागलोक या तीन्ही लोकांत तुझ्यासारखा स्वतंत्र कोण आहे? हे सद्गुरू जगन्नाथा, तुझ्यासारखा मोक्षदाता दुसरा कोण आहे? तू आमचे अखंड रक्षण कर.

**गतिविहीना आसरा ला**
**भत तुझा रे कर कृपा स**
**द्गति तया दे मी न अपराधी तुझा देव ।**

**श्रुतिवचन वदतात तू से**
**वित शरण जो तुजसि चिंतू**
**न तुजवर विश्वसत आम्हा रक्षि अनवरत ॥ ५४ ॥**

। गतिविहीना आसरा लाभत तुझा रे, कर कृपा सद्गति तया दे, मी न अपराधी तुझा, देव ॥ । श्रुतिवचन वदतात तू सेवित शरण जो तुजसि, चिंतून तुजवर विश्वसत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ५४ ॥

**भावार्थ** गतिविहीन निराश्रिताला तुझाच तर रे आसरा. त्यांच्यावर अनुग्रह कर, त्यांना सद्गती दे. हे देवा, मी तुझा कोणताही अपराध केलेला नाही. शरणागताची तूच सेवा करतोस असे वेद सांगतात. असे चिंतूनच मी तुजवर विसंबतो. तू आमचे अखंड रक्षण कर.

**देह आता होइ नष्ट क**
**धीहि हे विसरून रमलो**
**मीहि घर पत्नी प्रपंचादिमधि मी जात ।**
**मोहि रागी बुडुनि पुढचे**
**साहणे ना ज्ञात केवळ**
**चाहत तुझा संग आम्हा रक्षि अनवरत ॥ ५५ ॥**

। देह आता होइ नष्ट कधीहि हे विसरून रमलो मीहि घर पत्नी प्रपंचादिमधि मी जात ॥ । मोहि रागी बुडुनि, पुढचे साहणे ना ज्ञात, केवळ चाहत तुझा संग, आम्हा रक्षि अनवरत ॥ ५५ ॥

**भावार्थ** हा देह नश्वर आहे, तो कधीही नष्ट होईल, हे न जाणता, मी पत्नी, घर, प्रपंचादि गोष्टींमध्ये रमलो, रागमोहात बुडून गेलो, माझ्या भाग्यात पुढे काय सोसणे आहे ते मला माहीत नाही. मी तुझ्याशी मीलनाचा इच्छुक आहे. तू आमचे अखंड रक्षण कर.

मांसरुधिरा डोहि त्या नव
मास जननी उदरि परिपो
षास रस तुजविण तिथे प्रभु कोण बनवीत ।
तू सदय पालक असशि करु
णासमुद्रा घेउ का कम
लासनाचे रीण आम्हा रक्षि अनवरत ॥ ५६ ॥

। मांसरुधिरा डोहि त्या नवमास जननी उदरि परिपोषास रस तुजविण तिथे प्रभु कोण बनवीत ॥ । तू सदय पालक असशि करुणासमुद्रा, घेउ का कमलासनाचे रीण? आम्हा रक्षि अनवरत ॥ ५६ ॥

**भावार्थ** आईच्या गर्भात नऊ महिने त्या रक्तमांसाच्या डोहात पोषणरसाची निर्मिती, हे प्रभु, तुझ्याविणा कोण करते? हे करुणासमुद्रा, तू आमचा सदय पालक असताना कमलासनाचे, ब्रह्माचे, ऋण कशाला घ्यायचे? तू आमचे अखंड रक्षण कर.

जलचर नि खगकीटकतरू
कुलि जनन मम जाहलेचि स
कल मग अरे मानवा जन्मी न दे कष्ट ।
विलय न करो काल भजत वि
मल मने तुज मुरहर न आ
कलत मृत्यू हेतु आम्हा रक्षि अनवरत ॥ ५७ ॥

। जलचर नि खगकीटकतरूकुलि जनन मम जाहलेचि सकल, मग, अरे, मानवा जन्मी न दे, कष्ट ॥ । विलय न करो काल, भजत विमल मने तुज मुरहर न आकलत मत्यु हेतु, आम्हा रक्षि अनवरत ॥ ५७ ॥

**भावार्थ** जलचर, कीटक, पक्षी, प्राणी या सर्व योनींत माझा जन्म झाला व नंतरच मिळालेल्या या मानव जन्मात मला आता कष्ट देऊ नकोस. आता यमाकरवी मला मत्यु न येवो. जे आनंदाने, शुद्ध

मनाने तुला भजतात, हे मुरहरा, त्यांना मृत्यू देण्याचे कारण काय, ते समजत नाही. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** "मी ज्याला हात लावीन त्याला मृत्यू येईल" असा वर ब्रह्माकडून प्राप्त झालेल्या मुर असुराला विष्णूने युक्तीने स्वतःच्या छातीला हात लावायला लावून त्याचा मृत्यू घडवून आणला अशी आख्यायिका आहे. त्यावरून त्यास मुरहर, मुरारी असे नाव पडले.

**पंचभूततनूत निश्चित**
**संचरिसि तू फलित मम गत**
**संचिताचे का म्हणावे कोण मदमुदित ।**
**वंचनाभ्रम पाळतात प्र**
**पंचसकलापार तू का**
**किंचित असत कृष्ण आम्हा रक्षि अनवरत ॥ ५८ ॥**

। पंचभूततनूत निश्चित संचरिसि तू, फलित मम गतसंचिताचे का म्हणावे? कोण मदमुदित ॥ । वंचनाभ्रम पाळतात, प्रपंचसकलापार तू का किंचित असत, कृष्ण, आम्हा रक्षि अनवरत ॥ ५८ ॥

**भावार्थ** पंचमहाभूतांचे बनलेले हे शरीर तुमचेच निवासस्थान आहे. मग हे पूर्वसंचिताचे फलित आहे असे का म्हणावे? मानव जन्म मिळाला म्हणून अहंकाराने आनंदित झालेले हे कोण स्वतःची फसवणूक करून भ्रम निर्माण करीत आहेत? सर्व प्रपंचाच्या पलिकडे असलेला तू सामान्य का आहेस? हे कृष्णा, तू आमचे अखंड रक्षण कर.

**गतकृतिफले मूतछेद ब**
**हुत जननि संचारिले विच**
**लितपथा नच मिळत शुभफल देहि तू वसत ।**

नित मजसि जवळीक तव ला
भत सदय प्रेमे मग विलं
बित न मुक्तीमिलन आम्हा रक्षि अनवरत ॥ ५९ ॥

। गतकृतिफले मृतछेद बहुत जननि संचारिले, विचलितपथा नच मिळत शुभफल, देहि तू वसत ॥ । नित मजसि जवळीक तव लाभत सदय प्रेमे, मग विलंबित न मुक्तीमिलन, आम्हा रक्षि अनवरत ॥ ५९ ॥

**भावार्थ** गतकर्माच्या फलस्वरूप मी जन्म घेताना अनेक मातांच्या मूत्रच्छेदातून मार्गक्रमण केले. पण मी उचित मार्गावरून ढळल्यामुळे मला शुभफल मिळाले नाही. आता मी जाणतो, की तू माझ्या देहात वसत आहेस आणि तुझ्या कृपेने तुझ्या प्रेमाची जवळीक मला नित्य लाभत आहे. मग आता माझे मुक्तीशी मीलन होण्यास विलंब कसा बरे होईल? तू आमचे अखंड रक्षण कर.

देहभारा कैक थकलो
वाहुनी उबगूनि आणि न
पाहिले मी पदकमल तव बुडुनि कष्टात ।
साहिले जननमरणा फे
रे हटवुनी मुक्त करि आ
वाहि नरवर तुजसि आम्हा रक्षि अनवरत ॥ ६० ॥

। देहभारा कैक थकलो वाहुनी उबगुनि आणि न पाहिले मी पदकमल तव बुडुनि कष्टात ॥ । साहिले जननमरणा, फेरे हटवुनी मुक्त करि, आवाहि, नरवर, तुजसि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ६० ॥

**भावार्थ** कैक जन्मात देहांचा भार वाहून मी उबगलो आणि थकलो. कष्टात बुडलेल्या मला तुझे चरणकमल दिसलेच नाहीत. जन्ममरणांचे कित्येक फेरे मी सहन केले, ते फेरे संपवून मला

त्यातून मुक्त कर असे, हे नरवरा, मी तुला आवाहन करतो. तू आमचे अखंड रक्षण कर.

**बंधु तू मम आज तव अनु**
**बंध जन्मोजन्मि संग नि**
**बंधका तू असशि स्वामी म्हणुनि तव नसत ।**
**संधि मम कायेसि तव आ**
**राधितो मी चरणि दे मु**
**क्तीधन दयावंत आम्हा रक्षि अनवरत ॥ ६१ ॥**

। बंधु तू मम आज, तव अनुबंध जन्मोजन्मि संग, निबंधका तू असशि स्वामी, म्हणुनि तव नसत ॥ । संधि मम कायेसि, तव आराधितो मी चरणि दे मुक्तिधन दयावंत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ६१ ॥

**भावार्थ** आज, या जन्मी तू माझा प्रिय बंधू आहेस. जन्मोजन्मी माझ्या पाठीशी तुझी संगत जडलेली आहे. तू माझा अधिपती, अधिकारी आहेस. म्हणून प्रत्येक जन्मी मिळालेल्या माझ्या निरनिराळ्या शरीराशी तुझा संबंध नाही, तर तो माझ्या आत्म्याशी आहे. म्हणून तुझ्या चरणी मला सद्‌गती मिळो अशी मी, हे दयावंत, तुला विनवणी करतो. तू आमचे अखंड रक्षण कर.

**स्तनरस किती माय देत ग**
**णन न संभव क्षीरबिंदु ज**
**लनिधि साताहून अधिकचि भासती प्रमुख ।**
**जननमरणा क्षुद्र कमला**
**सन असत निरगाठ ही उक**
**लुन मजसि दे देव आम्हा रक्षि अनवरत ॥ ६२ ॥**

। स्तनरस किती माय देत, गणन न संभव क्षीरबिंदु, जलनिधि साताहून अधिकचि भासती, प्रमुख ॥ । जननमरणा क्षुद्र कमलासन असत, निरगाठ ही उकलुन मजसि दे देव, आम्हा रक्षि अनवरत ॥ ६२ ॥

**भावार्थ** कित्येक मातांनी मला स्तनपान दिले, त्यांच्या दुग्धबिंदूंची गणती संभवनीय आहे काय? ते तर सप्तसागरातील जलबिंदूहून अधिक भासतात. या सर्व जन्ममरणाच्या गुंत्याचा प्रमुख तर तो क्षुद्र कमलासन ब्रह्म आहे. माझ्या जीवनाला पडलेली ही निरगाठ, हे देवा, मजला उकलून दे. तू आमचे अखंड रक्षण कर.

**भासत विफल जननमरणचि**
**त्रासलो विटलो अरे जग**
**ण्यास असशी तूच त्राता तू अतिपवित्र ।**
**वास असता तव निकट करु**
**णासमुद्रा काय नड कम**
**लासनकृपा व्यर्थ आम्हा रक्षि अनवरत ॥ ६३ ॥**

। भासत विफल जननमरणचि, त्रासलो, विटलो, अरे, जगण्यास असशी तूच त्राता तू अतिपवित्र ॥ । वास असता तव निकट करुणासमुद्रा, काय नड कमलासनकृपा व्यर्थ? आम्हा रक्षि अनवरत ॥ ६३ ॥

**भावार्थ** जननमरण हे मला अर्थहीन वाटते. अरेरे, त्याला मी आता विटलो, त्रासलो आहे. या जीवनाचा तू त्राता आहेस. तू परमपवित्र आहेस. हे करुणासमुद्रा, तू आसपास असताना कमलासनाच्या कृपेची व्यर्थ काय निकड? तू अखंड आमचे रक्षण कर.

**कापुरुष षट्पंच भिडुनि स**
**मीप छळती मजसि परि ना**
**तू पुससि राहुनि अलिप्त बरे न हे गमत ।**
**श्रीपदांबुज सेवितो मम**
**पाप सकल निवार दे निज**
**रूपदर्शन पाव आम्हा रक्षि अनवरत ॥ ६४ ॥**

। कापुरुष षट्पंच भिडुनि समीप छळती मजसि, परि ना तू पुससि राहुनि अलिप्त, बरे न हे गमत ॥ । श्रीपदांबुज सेवितो, मम पाप सकल निवार, दे निजरूपदर्शन पाव, आम्हा रक्षि अनवरत ॥ ६४ ॥

**भावार्थ** पाचसहा खलपुरुष – माझ्या आतील षड्‌रिपू – माझ्या समीप भिडून मला छळताहेत. तू अलिप्त राहून माझी वास्तपुस्तही करीत नाहीस हे बरे नव्हे. श्रीचरणकमलांची मी सेवा करतो. माझ्या सर्व पापांचे निवारण कर आणि तुझ्या निजरूपात दर्शन देऊन आम्हाला पाव. तू आमचे आखंड रक्षण कर.

**पाच तत्त्वे एक एका**
**पाच ती पंचविस ज्या दे**
**ही चिर वसत निश्चित तुझा त्यात अधिवास ।**
**तोचि एक सचेत आत्मा**
**संचित जमा त्यास देइ य**
**थोचितचि सन्मान आम्हा रक्षि अनवरत** ॥ ६५ ॥

। पाच तत्त्वे, एक एका पाच, ती पंचविस ज्या देही चिर वसत, निश्चित तुझा त्यात अधिवास ॥ । तोचि एक सचेत आत्मा, संचित जमा त्यास देइ यथोचितचि सन्मान, आम्हा रक्षि अनवरत ॥ ६५ ॥

**भावार्थ** पाच तत्त्वे आणि त्यांची प्रत्येकी पाच अशी पंचवीस तत्त्वे ज्या देहात वसतात, त्यात तू न चुकता वास करतोस. त्या सर्वांमध्ये एकच अविभक्त जीवात्मा असतो. त्याने मिळविलेल्या सर्व कर्मसंचिताचा आदर करून तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** पाच हा अंक योगशास्त्रात अनेकदा येतो. त्यामुळे या षट्पदीतील पंचवीस तत्त्वांचे स्पष्टीकरण विविध प्रकारे करण्यात येते.

जीवात्मा, मन, बुद्धी, अहंभाव, चित्त ही पाच मूलतत्त्वे,
प्राण, अपान, व्यान, उदान, समान हे पंचप्राण,
पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश ही पंचमहाभूते,

डोळे, नाक, कान, जीभ, त्वचा ही पाच ज्ञानेंद्रिये,
शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या पाच तन्मात्रा,
दोन हाथ, दोन पाय, जननेंद्रिय ही पाच कर्मेंद्रिये,
अशी सर्व मिळवून पंचवीस तत्त्वे या देहात वसतात असे यात अभिप्रेत असावे.

**अष्ट वीत तनूस केशचि**
**अष्ट कोटी अस्थिला अडु**
**सष्ट सांधे मांसयुक्त गृहात तू अतिथि ।**
**तुष्टि मनि परि शुष्क कंदुक**
**वेष्टित बनत त्यागिता अव**
**शिष्ट काय फलितचि आम्हा रक्षि अनवरत ॥ ६६ ॥**

। अष्ट वीत तनूस केशचि अष्ट कोटी, अस्थिला अडुसष्ट सांधे, मांसयुक्त गृहात तू अतिथि ॥ । तुष्टि मनि, परि शुष्क कंदुकवेष्टित बनत त्यागिता, अवशिष्ट काय फलितचि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ६६ ॥

**भावार्थ** आठ वितांचे हे शरीर, त्यावर आठ कोटी केस, हाडांचे अडुसष्ट सांधे. अशा या मांसयुक्त शरीरात तू मनापासून संतुष्ट अतिथी होऊन रहतोस. पण तू या शरीराला सोडून जाताच त्याला कोरड्या गोळ्यांनी झाकून टाकले जाते. मग या शरीराचे काय फलित उरले? तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** कोरड्या गोळ्यांचा निर्देश पार्थिव पुरताना ठेवलेली मातीची ढेकळे किंवा दहन करण्यासाठी ठेवलेले शेणगोळे सुचवीत असावा.

**स्नान संध्या ध्यान जप तप**
**दान धर्म परोपकारवि**
**हीन कर्मी मग्न अन्य न मार्ग मज मुक्ति ।**

**ज्ञान नच जर अन्य कर्म क**
**रूनि निष्फळ कारण मम ब**
**नूनि तू भक्तीस आम्हा रक्षि अनवरत ॥ ६७ ॥**

। स्नान-संध्या-ध्यान-जप-तप-दान-धर्म-परोपकारविहीन कर्मी मग्न, अन्य न मार्ग मज, मुक्ति ॥ । ज्ञान नच जर, अन्य कर्म करूनि निष्फळ, कारण मम बनूनि तू भक्तीस आम्हा रक्षि अनवरत ॥ ६७ ॥

**भावार्थ** स्नान, संध्या, ध्यान, जप, तप, दान, धर्म, परोपकार हे काही न करता मी अन्य कर्मात मग्न झालो आहे. माझ्यापुढे याशिवाय दुसरा मार्ग नाही. जर मोक्ष कसा मिळवायचा याचे ज्ञान नसेल तर अन्य कर्मे करूनही ती निष्फळ आहेत. माझ्या तुजप्रती भक्तीचे कारण बनून तू आमचे अखंड रक्षण कर.

**कोप देही या मम महा**
**पाप या पापास्तव नरक**
**कूपि पडणे अटळ शास्त्रे सिद्ध हे जात ।**
**ना परत यम रिक्त मजसी**
**पापरहितचि बनव कीर्तिक**
**लाप तव जपण्यास आम्हा रक्षि अनवरत ॥ ६८ ॥**

। कोप देही या मम महापाप, या पापास्तव नरककूपि पडणे अटळ शास्त्रे सिद्ध हे, जात ॥ । ना परत यम रिक्त, मजसी पापरहितचि बनव कीर्तिकलाप तव जपण्यास, आम्हा रक्षि अनवरत ॥ ६८ ॥

**भावार्थ** माझ्या या शरीरात जो कोप आहे तो महापापाला कारणीभूत होतो. अशा पातकाने ग्रस्त झाल्यावर नरककूपात पडणे अटळ आहे हे तर शास्त्रसिद्ध आहे. त्याची निश्चिती केल्याशिवाय यम काही रिकाम्या हाताने परत जाणार नाही, त्यामुळे तू स्वतःचा कीर्तिसंभार राखण्यासाठी, मी पापरहित राहीन असे बघ, माझा

कोप कसा लयाला जाईल त्याचे मार्गदर्शन कर. तू आमचे अखंड रक्षण कर.

सूत्र तव चालवत चेतन
तंत्र या जगतात सुटत नि
यंत्रणचि तर बाहुल्या डळमळति त्या सकळ।
सूत्र नसताचि कवण अहं
तंत्र भद्राभद्र चेष्टित
मात्र अर्पित तुजसि आम्हा रक्षि अनवरत ॥ ६९ ॥

। सूत्र तव चालवत चेतनतंत्र या जगतात, सुटत नियंत्रणचि तर बाहुल्या डळमळति त्या सकळ ॥ । सूत्र नसताचि कवण अहंतंत्र, भद्राभद्र चेष्टितमात्र अर्पित तुजसि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ६९ ॥

**भावार्थ** या चराचराच्या चैतन्याचा तूच सूत्रधार आहेस. तुझे नियंत्रण नसेल तर चराचरातील सर्व कटपुतळ्या डळमळित होतात. तुझे सूत्रचालन नसेल तर, आम्हाला जरी तसे वाटते तरी, कोण स्वतंत्र असतो? आमचे सर्व चांगले, वाईट कर्म तुला अर्पण करतो. तू आमचे अखंड रक्षण कर.

मम नियंता तूचि परि पद
कमल तव मी खल न भजिले
रमत संततिपत्निमधि मन सतत पण कवण ।
मम अपत्ये पत्नि अधिका
र मम तनुवर तव धरा हा
त मुदित नका सोडु आम्हा रक्षि अनवरत ॥ ७० ॥

। मम नियंता तूचि परि पदकमल तव मी खल न भजिले, रमत संततिपत्निमधि मन सतत, पण कवण ॥ । मम अपत्ये पत्नि, अधिकार मम तनुवर तव, धरा हात मुदित, नका सोडु, आम्हा रक्षि अनवरत ॥ ७० ॥

**भावार्थ** माझा नियंता स्वामी तू आहेस हे मी जाणतो. तरीही तुझे चरण म्यां दुष्टाने भजिले नाहीत. माझे मन सतत, वारंवार पत्नी मुलांमध्ये गुंतले. पण कोण माझी पत्नी आणि कोण अपत्ये? माझ्या शरीरावर तर तुझेच स्वामित्त्व आहे. यास्तव तू माझा आनंदाने हाथ धर व तो न सोडता तू आमचे अखंड रक्षण कर.

**शिर कुवचने भक्षिती बहु**
**करिति जर्जर कंटके मज**
**सि रिपु अति छळतात पापविनाशका रक्षि ।**
**शरण रे मी दास दीना**
**परमबंधू तू मजसि नि**
**ष्ठुर बनसि मग काय? आम्हा रक्षि अनवरत ॥ ७१ ॥**

। शिर कुवचने भक्षिती, बहु करिति जर्जर कंटके मजसि रिपु अति छळतात, पाप विनाशका रक्षि ॥ । शरण रे मी दास, दीना परमबंधू तू, मजसि निष्ठुर बनसि मग काय? आम्हा रक्षि अनवरत ॥ ७१ ॥

**भावार्थ** काहीजण वाईटसाईट बोलून माझे डोके खातात. काही शत्रू, माझे षड्‌रिपू, मला काट्यांसारखे टोचून त्रस्त करतात. हे पापनाशका तू त्यांच्यापासून माझे रक्षण कर. मी तुला शरण आलेला तुझा सेवक आहे आणि तू दीनांचा परमबंधू. मग तू माझ्याशी निष्ठुर बनशील काय? तू आमचे अखंड रक्षण कर.

**दंडधरपाशाप्रती भय**
**गंड कोणात नच दिसला**
**पुंडरीकज शीर्ष तोडुनि खंड जो करित ।**
**खंडपरशू रुद्रभूमधि**
**हिंडत निरुद्देश तू उ**
**द्दंड सुरगणदेव आम्हा रक्षि अनवरत ॥ ७२ ॥**

। दंडधरपाशाप्रती भयगंड कोणात नच दिसला, पुंडरीकज शीर्ष तोडुनि खंड जो करित ॥ । खंडपरशू रूद्रभूमधि हिंडत निरूद्देश, तू उद्दंड सुरगणदेव, आम्हा रक्षि अनवरत ॥ ७२ ॥

**भावार्थ** दंडधर यमाच्या पाशाचे भय तर कोणात दिसत नाही. कमलोद्भव ब्रह्माचे शिर उडवून त्याची शकले करणारा शिवशंकर तर रूद्रभूमी स्माशानातच निरूद्देश हिंडतो आहे. तू देवांचा देव आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** पुंडरीक म्हणजे कमळ. त्यातून जन्मलेल्या ब्रह्मदेवाला असलेल्या पाच मस्तकांचा त्याला अभिमान होता. म्हणून शंकराने त्याचे पाचवे मस्तक उडवून त्याची शकले केली अशी आख्यायिका आहे.

**शक्ति ती मायाचि माया**
**शक्ति देही पण असत तू**
**मुक्तिदायक काय सुखदुःखात तिज पाड ।**
**युक्तिने समजून चित्ति वि**
**रक्तिने भजिल्यास मुक्तिस**
**भक्ति कारण होत आम्हा रक्षि अनवरत ॥ ७३ ॥**

। शक्ति ती मायाचि, माया शक्ति देही, पण असत तू मुक्तिदायक, काय सुखदुःखात तिज पाड ॥ । युक्तिने समजून चित्ति विरक्तिने भजिल्यास मुक्तिस भक्ति कारण होत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ७३ ॥

**भावार्थ** शक्ती ही माया आहे. पण तू मुक्तिदाता शरीरात वास करीत असता, माया असलेल्या त्या शक्तीचा काय पाड? युक्तीने, ज्ञानाने हे समजून चित्तात विरक्त होऊन तुझे भजन करणाऱ्याच्या मुक्तीला ती भक्तीच कारणीभूत होते. तू आमचे आखंड रक्षण कर.

**तीन गुण उन्नत तयामधि**
**तीन मूर्ती त्या दिसत शो**
**भून सृष्टिस्थितिलय रचुनि होत प्रलयात ।**
**तीन रूपे एक प्रलयज**
**ळी निजत वटपत्रि मिलित त**
**रून आता तूच आम्हा रक्षि अनवरत** ॥ ७४ ॥

। तीन गुण उन्नत, तयामधि तीन मूर्ती त्या दिसत शोभून सृष्टिस्थितिलय रचुनि, होत प्रलयात ॥ । तीन रूपे एक, प्रलयजळी निजत वटपत्रि मिलित तरून, आता तूच आम्हा रक्षि अनवरत ॥ ७४ ॥

**भावार्थ** सत्त्व, रज, तम हे तीन गुण उभारून येतात. त्यातून वर आलेल्या ब्रह्म, विष्णू, महेश या तीन मूर्ती सृष्टि, स्थिती, लय, म्हणजेच सृजन, स्थितिरक्षण आणि विलय, या विश्वाच्या त्रिविध रचनेत शोभून दिसतात. प्रलयकाळी ती तीन रूपे एकरूप होतात. ते रूप, म्हणजे तू, अथांग प्रलयजळात मिळालेल्या वटपत्रावर तरंगत शयन करतोस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**तरत तन जलफेनसम भं**
**गुर दिसत झणि घेत भवसा**
**गरमहा उदरात देऊनी प्रसाद मज ।**
**परममोद पदास तू उ**
**द्धर कवण बंधू अरे मज**
**सरस तुजसम असत आम्हा रक्षि अनवरत** ॥ ७५ ॥

। तरत तन जलफेनसम भंगुर, दिसत झणि घेत भवसागरमहा उदरात देऊनी प्रसाद मज ॥ । परममोद पदास मज उद्धर, कवण बंधू, अरे, मज सरस तुजसम असत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ७५ ॥

**भावार्थ** पाण्यावर तरंगणाऱ्या बुडबुड्याप्रमाणे हे शरीर नाशवंत आहे, ते दिसते आणि क्षणात हा विशाल भवसागरात त्याला आपल्या पोटात घेतो. तू मजला प्रसाद देऊन माझा परमानंदपदी उद्धार कर. खरेच, या जगात तुझ्यासारखा बांधव कोण आहे? तू आमचे अखंड रक्षण कर.

**उडिददल कधि दर्पणावर**
**न डकत पलट पडत तन हे**
**पडत निमिषामधि तसे मी पाशि तनुनाम ।**
**अडकत कवण हेतु ममते**
**जडुन राहसि तू न काही**
**घडवि भक्तविरोधि आम्हा रक्षि अनवरत ॥ ७६ ॥**

। उडिददल कधि दर्पणावर न डकत, पलट पडत, तन हे पडत निमिषामधि तसे, मी पाशि तनुनाम ॥ । अडकत, कवण हेतु ममते जडुन राहसि, तू न काही घडवि भक्तविरोधि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ७६ ॥

**भावार्थ** उडदाची डाळ आरशाला कधी चिकटत नाही, पलटून पडते, तसेच हे शरीरसुद्धा क्षणात पडते व आत्म्यापासून बिलग होते. तनु नावाच्या पाशात मी अडकलो आहे. मग त्या तनूत तू ममतेने राहतोस त्याचा हेतु काय? भक्ताच्या विरुद्ध काही न होईल असे पहा. तू आमचे अखंड रक्षण कर.

**बिकट मागत ते जिणे अन्**
**फुकट कष्टातच जिणे दी**
**पकशिखा पवनी तसे संसारसुख समज ।**
**सुकर जीवन इच्छिता से**
**वक बनुनि तव असत हितका**
**रक जिणे भक्तिरत आम्हा रक्षि अनवरत ॥ ७७ ॥**

। बिकट मागत ते जिणे अन फुकट कष्टातच जिणे, दीपकशिखा पवनी तसे संसारसुख समज ॥ । सुकर जीवन इच्छिता, सेवक बनुनि तव असत हितकारक जिणे भक्तिरत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ७७ ॥

**भावार्थ** संसारात याचना करीत जगणे अतिकठीण, कष्टदायक असते. असे कष्टी जीवन निरर्थक आहे. संसारसुख हे वाऱ्यात ठेवलेल्या दिव्याच्या कंपायमान ज्योतीप्रमाणे असते. सुकर जीवनाची अभिलाषा असणाऱ्यांनी तुझा सेवक बनून तुझ्या भक्तीत रममाण होऊन जगणेच हितकारक आहे. तू आमचे अखंड रक्षण कर.

**देहधारक बनुनि बहुविध**
**मोह रेटुन मुक्ति लोटुन**
**राहतो आपणचि विषयादिमधि हा फसत ।**
**देह नित्य अजाणता भव**
**मोहि जो मतिहीन मानव**
**साहसी हे चूक आम्हा रक्षि अनवरत ॥ ७८ ॥**

। देहधारक बनुनि बहुविध मोह रेटुन मुक्ति लोटुन राहतो आपणचि, विषयादिमधि हा फसत ॥ । देह नित्य अजाणता भवमोहि जो, मतिहीन मानव साहसी हे चूक, आम्हा रक्षि अनवरत ॥ ७८ ॥

**भावार्थ** हा देहधारण करून बहुविध मोहांना उत्तेजित करून मी मुक्तीपासून बहिष्कृत राहतो. ज्याचा देह अजाणता सतत विषयसुखांमध्ये संसारमोहात फसतो, त्या मतिहीन मानवाला साहसी म्हणणे चूक आहे. आमचे अखंड रक्षण कर.

**भंगुर तनाधारधृत उप**
**भोगि आतुर होउन यमा**
**लागि ऋणि बनत जगण्यापरि कळवळुन बहुत ।**

रंगुनी तव नामि पातक
सांगता करि ते विवेकी
चांगले जीवनचि आम्हा रक्षि अनवरत ॥ ७९ ॥

। भंगुर तनाधारधन उपभोगि आतुर होउन यमाल्लागि ऋणि बनत जगण्यापरि कळवळुन बहुत ॥ । रंगुनी तव नामि पातकसांगता करि ते विवेकी चांगले जीवनचि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ७९ ॥

**भावार्थ** सहज भंगणाऱ्या या शरीरावर विसंबून उपभोगाला आतुर होऊन यमाच्या ऋणाचे ओझे वाहणाऱ्या अतिव्याकुळ जीवनापेक्षा तुझ्या नामस्मरणात रंगून पापाचा अंत करणारे विवेकविचारी जीवनच चांगले. तू आमचे अखंड रक्षण कर.

शत शक जिणे मग उणे निम
शत निशा त्यातून तीस स
रतचि वर्षे बालवृद्धकुमारकालात ।
धृत मनी तुज मानस मम दि
सत तुझ्या ठायी प्रभो सं
वतदुदशकचि शेष आम्हा रक्षि अनवरत ॥ ८० ॥

। शत शक जिणे, मग उणे निमशत निशा त्यातून, तीस सरतचि वर्षे बालवृद्धकुमारकालात ॥ । धृत मनी तुज, मानस मम दिसत तुझ्या ठायी, प्रभो, संवतदुदशकचि शेष, आम्हा रक्षि अनवरत ॥ ८० ॥

**भावार्थ** शंभर वर्षांचे जीवन, त्यातून रात्रींमध्ये वाया जाणारी पन्नास वर्षे वजा केली, तीस वर्ष बालपण, कुमारवय व उतारवय यात गेली. मग, हे प्रभो, उरलेली केवळ वीसच वर्षे मी मनात तुला धारण केले, माझे मन तुझ्या ठायी दिसले. तू आमचे अखंड रक्षण कर.

**पूर अमुक न मजसि मी तन**
**धारिले कित्येक बिनसं**
**चार नसत ठिकाण भाषा उरत न निरुक्त ।**
**खेरिज न काही नवे ना**
**सारसेवन शेष तनुसं**
**चारचि असा होत आम्हा रक्षि अनवरत** ॥ ८१ ॥

। पूर अमुक न मजसि, मी तन धारिले कित्येक, बिनसंचार नसत ठिकाण, भाषा उरत न निरुक्त ॥ । खेरिज न काही नवे, ना सारसेवन शेष, तनुसंचारचि असा होत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ८१ ॥

**भावार्थ** मला अमुकच असा गाव नाही, कितीतरी निरनिराळी शरीरे मी धारण केली. मी संचार केला नाही असे स्थळ नाही. मी न उच्चारलेली भाषा नाही. याशिवाय आणखी नवे काही नाही. कोणतेही रसपूर्ण अन्नसेवन बाकी नाही. अशा प्रकारे माझ्या शरीराचा संचार झालेला आहे. तू आमचे अखंड रक्षण कर.

**गोपुरधुरातोल पृष्ठी**
**रूपमूर्ति न धरत कोण त**
**शा परीने वाहतो भवभार समजून ।**
**मी पराक्रमि मनुज मग चा**
**ले पथ विपर्यस्त जगती**
**आपण दशदिशांत आम्हा रक्षि अनवरत** ॥ ८२ ॥

। गोपुरधुरातोल पृष्ठी रूपमूर्ति न धरत, कोण तशा परीने वाहतो भवभार, समजून ॥ । मी पराक्रमि, मनुज मग चाले पथ विपर्यस्त, जगती आपण दशदिशांत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ८२ ॥

**भावार्थ** गोपुराच्या पृष्टभागावरील विविध रूपातील मूर्ती त्याचा तोल सावरून धरत नाहीत. तशाच परीने या संसाराचा भार कोण

वाहत आहे? मी पराक्रमी असून मीच तो भार वाहतो आहे असे समजून मग मनुष्य विकृत मार्ग अनुसरतो. या जगाला दाही दिशात तूच व्यापून राहिला आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**बीज तरुमधि जनत वृक्षा**
**बीज देत कवण उलगडत**
**बीजतरुन्याया कवण जगतात आकलत ।**
**हे जटिल नवल तुज विश्वचि**
**हे जनत तुझियातुनी सुर**
**राजनंदन नमित आम्हा रक्षि अनवरत ॥ ८३ ॥**

। बीज तरुमधि जनत, वृक्षा बीज देत कवण उलगडत बीजतरुन्याया कवण जगतात, आकलत ॥ । हे जटिल नवल तुज, विश्वचि हे जनत तुझियातुनी, सुरराजनंदन नमित, आम्हा रक्षि अनवरत ॥ ८३ ॥

**भावार्थ** बीज हे तरूमध्ये जन्म घेते. पण त्या तरूला बीज कोण देते आणि या जगात या वृक्षबीजन्यायाची उकल करणारा तुझ्याशिवाय आणखी कोण आहे? या गूढ आश्चर्याचे आकलन केवळ तुलाच होते. हे अखिल विश्व तुझ्यातूनच तर निर्माण झाले आहे. हे सुरराजनंदननमित, तू आमचे अखंड रक्षण कर.

**चारविध जगि बाहुल्या आ**
**कारती लेवून चर्म उ**
**भारती चौसष्ट लक्षणजातिधर्मात ।**
**धारुन विविध नाम जीवा**
**कार लेवुन नाम तव सं**
**चारती विश्वात आम्हा रक्षि अनवरत ॥ ८४ ॥**

। चारविध जगि बाहुल्या आकारती लेवून चर्म, उभारती चौसष्ट लक्षणजातिधर्मात ॥ । धारुन विविध नाम जीवाकार लेवुन नाम तव संचारती विश्वात, आम्हा रक्षि अनवरत ॥ ८४ ॥

**भावार्थ** लक्षणे म्हणजे प्रकटगुण, जाति म्हणजे सहजगुण, धर्म म्हणजे विहितगुण, असे चौसष्ट गुण घेऊन चामडे पांघरलेल्या चार प्रकारच्या बाहुल्या या जगात आकार घेतात. ते सर्व प्रकारचे जीव विविध नावे धारण करतात, पण तुझेच नाव घेऊन विश्वात संचारताना दिसतात. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** देव, मनुष्य, स्थावर आणि तिर्यक अशा चार प्रकारच्या चर्मपुतळ्या यात अध्याहृत असाव्यात.

**मांस भिंती अस्थि काष्ठ शि**
**रासमुच्चय संघटित तव**
**वास आत्मा बनुनि या तनुरूपि सदनात ।**
**हे सदन गौण सरता तव**
**वास जळके बघुनि करि वि**
**श्वास वसतिस कोण आम्हा रक्षि अनवरत ॥ ८५ ॥**

। मांस भिंती, अस्थि काष्ठ, शिरासमुच्चय संघटित, तव वास आत्मा बनुनि या तनुरूपि सदनात ॥ । हे सदन गौण सरता तव वास, जळके बघुनि करि विश्वास वसतिस कोण, आम्हा रक्षि अनवरत ॥ ८५ ॥

**भावार्थ** मांसाच्या भिंती, चौकटीसाठी हाडांची लाकडे, शिरांच्या संचाने एकत्र बांधलेल्या या शरीररूपी घरात आत्मा बनून तू राहतोस. त्यातला तुझा अधिवास संपताच ते सदन क्षुद्र होते. स्मशानात जळणारे शरीर बघून ते वसतीस योग्य असल्याचा विश्वास कोणाला वाटेल? तू आमचे अखंड रक्षण कर.

**बिनकुलुपमुद्रा उघड अस**
**त नउ दारे बंद ना ती**
**दिननिशा जोवर तिथे जीवात्म अधिवसत ।**
**तनु झटकुनी अटळ जलद ग**
**मन समय होता जरा हो**
**त न इथे नि तिथेहि आम्हा रक्षि अनवरत ॥ ८६ ॥**

। बिनकुलुपमुद्रा उघड असत नउ दारे, बंद ना ती दिननिशा जोवर तिथे जीवात्म अधिवसत ॥ । तनु झटकुनी अटळ जलद गमन समय होता, जरा होत न इथे नि तिथेहि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ८६ ॥

भावार्थ या तनूरूपी नगरीत जोवर जीवात्मा अधिवास करीत आहे, तोवर तिथे कुलुपबंद किंवा मुद्राबंद नसलेली नऊ दारे दिवसरात्र उघडी असतात. तुझी अनुज्ञा होताक्षणी ते शरीर टाकून लगेच निघून जाणे मात्र अटळ आहे. त्यात मग जराही इकडे तिकडे होणे नाही. तू आमचे अखंड रक्षण कर.

टीपा शरीराच्या दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, तोंड, गुदद्वार व मूत्रमार्ग या नऊ दारांचा संदर्भ यात आहे.

**कील भक्कम पाच फिरते**
**गोल दोन रथात त्रैगुण**
**शील व्यक्ती बसुनि पुढती भ्रमण करतात ।**
**कील अंती एक गळता**
**कालगति बिघडे तया अनु**
**कूल वळविसि तूचि आम्हा रक्षि अनवरत ॥ ८७ ॥**

। कील भक्कम पाच, फिरते गोल दोन, रथात त्रैगुणशील व्यक्ती बसुनि पुढती भ्रमण करतात ॥ । कील अंती एक गळता कालगति बिघडे, तया अनुकूल वळविसि तूचि, आम्हा रक्षि अनवरत ॥ ८७ ॥

**भावार्थ** पाच मजबूत पाचर, जोड आणि दोन फिरती चक्रे असलेल्या या शरीररथात अग्रभागी बसून त्रिगुणवंत सारथी संचार करतो. त्यातील एक पाचर गळून पडताच रथाची कालगती बिघडते. तूच त्यास पुन्हा अनुकूल करू शकतोस. आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** शरीररूपी रथाची पंचेंद्रिये म्हणजे पाच पाचरी आणि दोन पाय ही दोन चाके आहेत. सत्य, रज, तम या तीन गुणांनी युक्त असा आत्मा रथाच्या अग्रभागी बसून संचार करीत आहे.

**रगतकचचामयुत शरिरा**
**स गड गणले सज्ज पण रो**
**ग गळ टाकुन वेढित मजसि प्राण हरण्यास ।**
**लगत मज येतात यमदू**
**तगण विळखा उठव हटवू**
**न गहन मरणसैन्य आम्हा रक्षि अनवरत ॥ ८८ ॥**

। रगतकचचामयुत शरिरास गड गणले, सज्ज पण रोग गळ टाकुन वेढित मजसि प्राण हरण्यास ॥ । लगत मज येतात यमदूतगण, विळखा उठव हटवून गहन मरणसैन्य, आम्हा रक्षि अनवरत ॥ ८८ ॥

**भावार्थ** रक्त, केस, चामडे यांनी बनलेल्या या शरीरास गड मानून मी स्वस्थ राहिलो. पण कैक रोग मला विळखा घालून माझे प्राणहरण करायला गळ टाकून सज्ज आहेत. यमदूत माझ्या जवळ येत आहेत. हे दुष्कर मृत्युलष्कर हटवून त्यांचा विळखा तू उठव. आमचे अखंड रक्षण कर.

**वारणाष्टक शोभत नऊ**
**दार सदना प्रखर राखण**
**दार चाकर रक्षिती कवणा न आकलत ।**

तारिता व्यापून तूच जि
व्हार वससी तुज विनविण्या
कारणचि मग काय आम्हा रक्षि अनवरत ॥ ८९ ॥

। वारणाष्टक शोभत, नऊ दार मदना प्रखर राखणदार चाकर रक्षिनी, कवणा न आकलत ॥ । तारिता व्यापून तूच जिव्हार वससी, तुज विनविण्या कारणचि मग काय, आम्हा रक्षि अनवरत ॥ ८९ ॥

**भावार्थ** आठ हत्ती या घराची कवचे शोभत आहेत. त्याच्या नऊ दरवाजांत उग्र राखणदार रक्षण करण्यास उभे आहेत. पण हे कोणालाच कळून येत नाही की तू तारणहार या घराच्या गाभाऱ्यात वास करत असतोस. मग तुझ्याकडे काही विनवणी करण्यास कारणच उरत नाही. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** वारण या शब्दाचे दोन अर्थ आहेत – हत्ती आणि रक्षक. आठ हत्तींचा संदर्भ यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि या अष्टयोगांशी असावा. किंवा जल, अग्नी, वायू, भूमी, आकाश, मन, बुद्धी, अहंकार हे ते आठ गज असावेत. पंचेंद्रिये म्हणजे राखणदार चाकर असावेत.

सांगण्या मज न बळ टाकत
अंगदेशी धाड बांधुनि
चंग यमदूत धरुनी लूट करतिल मलिन ।
चांगली तनु जाणि आता
अंग ना जगणेचि तनुगड
भंगण्याआधीच आम्हा रक्षि अनवरत ॥ ९० ॥

। सांगण्या मज न बळ, टाकत अंगदेशी धाड धरुनी चंग यमदूत, बांधुनि लूट करतिल मलिन ॥ । चांगली तनु, जाणि आता अंग ना जगणेचि, तनुगड भंगण्याआधीच आम्हा रक्षि अनवरत ॥ ९० ॥

**भावार्थ** या अंगदेशावर, शरीरावर धाड टाकण्यासाठी यमदूत चंग बांधून बसले असताना काही सांगण्याबोलण्याचे बळ माझ्यात नाही. त्या धाडीतील लूट, म्हणजेच माझे चांगले शरीर धरून ते मलिन करून टाकतील. या शरीराला आता जगायचे कसे ते समजत नाही. शरीराचा हा किल्ला तुटून लुटून जाण्याआधीच तू आमचे अखंड रक्षण कर.

**बोलगात्र नि नयन नाक क**
**पाल करपद सकल सेवित**
**मूलकर्ता विहित सेवेलागि ते सिद्ध ।**
**लीलया सरत जर आयु**
**ष्काल स्वाधीन तव जगदनु**
**कूल त्यांचीच गत आम्हा रक्षि अनवरत ॥ ९१ ॥**

। बोलगात्र नि नयन नाक कपाल करपद, सकल सेवित मूलकर्ता, विहित सेवेलागि ते सिद्ध ॥ । लीलया सरत जर आयुष्काल, स्वाधीन तव जगदनुकूल त्यांचीच गत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ९१ ॥

**भावार्थ** जीभ, डोळे, नाक, कपाळ, हात, पाय हे सर्व या शरीराच्या मूलकर्त्याचे, तुझे सेवक आहेत आणि ते त्यांना नेमून दिलेल्या सेवेसाठी सहजसिद्ध आहेत. पण आयुष्काल संपताच त्यांची जगदनुकूल अशी काय गत करायची ते तुझ्या स्वाधीन आहे. तू आमचे अखंड रक्षण कर.

**रुदन मरणा का जर न ज**
**न्मद न पालक अमर असती**
**रुदन का जर या जगी कोणीच ना टिकत ।**
**रुदन निष्फळ मरण जर स**
**ज्ज दिसत जननमरण ते पू**
**र्वद ऋण तुझे होत आम्हा रक्षि अनवरत ॥ ९२ ॥**

। रुदन मरणा का? जर न जन्मद न पालक अमर असती, रुदन का जर या जगी कोणीच ना टिकत? ॥ । रुदन निष्फळ मरण जर सज्ज दिसत, जननमरण ते पूर्वद ऋण तुझे होत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ९२ ॥

**भावार्थ** मरणासाठी काय ते रडायचे? ना आपले जन्मदाते अमर आहेत, ना पोषणकर्ते. जर या जगात कोणीच कायम टिकत नसेल तर रडून काय करणार? मत्यू पाठीमागे सज्ज दिसत असताना रुदन निष्फळ आहे. जन्ममत्यू हे तुझेच तर पूर्वीचे ऋण आहे. तू आमचे अखंड रक्षण कर.

**मृत्तिकाजात पुतळी हो**
**मृत्तिकायुक्त मुदित करिसि**
**मृत्तिकाहारास जीवा पुष्टि उपचार ।**
**मृत्तिकायुत तन न मिळवी**
**मृत्तिकेतचि दान वरदा**
**वृत्ति करुनि ज्ञानी आम्हा रक्षि अनवरत ॥ ९३ ॥**

। मत्तिकाजात पुतळी हो मत्तिकायुक्त, मुदित करिसि मत्तिकाहारास जीवा पुष्टि उपचार ॥ । मत्तिकायुत तन न मिळवी मत्तिकेतचि, दान वरदा, वत्ति करुनि ज्ञानी आम्हा रक्षि अनवरत ॥ ९३ ॥

**भावार्थ** मातीतून निर्माण झालेली मातीचीच बनलेली ही बाहुली. तिचे मातीने तयार झालेल्या आहाराने आनंदाने पोषण करण्याचा उपचार तू पाळतोस. हा मातीचा देह मातीतच न मिळविण्याची कृपा कर. हे वरद, आम्हास ज्ञानी वत्ती बहाल करून तू आमचे अखंड रक्षण कर.

**देह झिजत जरी निरंतर**
**राहतोस तयात देसी**
**वाहण्या अति कष्ट हितकर तव जरी असत ।**

**गेह हे मायविलग शिशू**
**साहत जसे हाय चिंता**
**वाहक नको सोडु आम्हा रक्षि अनवरत ॥ ९४ ॥**

। देह झिजत जरी निरंतर राहतोस तयात, देसी वाहण्या अति कष्ट, हितकर तव जरी असत ॥। गेह हे, मायविलग शिशू साहत जसे, हाय, चिंतावाहक नको सोडु, आम्हा रक्षि अनवरत ॥ ९४ ॥

**भावार्थ** तू निरंतर या देहात राहतोस, तरीसुद्धा तो झिजतो. हितकर अशा तुझे हे घर असूनही तू आम्हाला वाहण्यास कष्ट देतोस, आईपासून ताटातूट झालेल्या बालकाप्रमाणे मी ते सोसतो आहे. आमची चिंता तू वाहतोस, आम्हास सोडू सकोस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**न मज ठावे आदि जननी**
**न मरणी अंत तर दोहो**
**त मधला निपुण म्हणणे हास्यजनकचि असत ।**
**समजतो जो आदि अंत ख**
**लु मदनजनक तूचि तव पद**
**कमल मजसि हवेत आम्हा रक्षि अनवरत ॥ ९५ ॥**

। न मज ठावे आदि जननी न मरणी अंत, तर दोहोत मधला निपुण म्हणणे हास्यजनकचि असत ॥ । समजतो जो आदि अंत खलु मदनजनक तूचि तव पदकमल मजसि हवेत, आम्हा रक्षि अनवरत ॥ ९५ ॥

**भावार्थ** मला ना जन्माच्या वेळची आयुष्याची सुरुवात कशी होती ते ठाऊक, ना मरणाच्या वेळचा अंत ठाऊक. मग त्यामधल्या काळाचा मी तज्ज्ञ आहे असे म्हणणे हास्यास्पद आहे. हे मदनाचा पिता, हा आदि अंत ज्याला समजतो तो तर तूच आहेस.

मला तुझ्या चरणकमलांची ओढ आहे. तू आमचे अखंड रक्षण कर.

रसविहीन शरीर तू ही
रसविहीन तनू भरून नि
वसत पण मग अंतकाळी दूर जाण्यास ।
निसटतोस जिवास ठरवू
न सकलंक कुणी अशा स्तव
नसुमने का देत आम्हा रक्षि अनवरत ॥ ९६ ॥

। रसविहीन शरीर, तू ही रसविहीन तनू भरून निवसत, पण मग अंतकाळी दूर जाण्यास ॥ । निसटतोस जिवास ठरवून सकलंक, कुणी अशा स्तवनसुमने का देत? आम्हा रक्षि अनवरत ॥ ९६ ॥

**भावार्थ** हे रसहीन शरीर! अशा रसहीन तनूत तू सर्वत्र भरून काही काळ निवास करतोस. परंतु, अंतकाळ येताच त्या शरीरातून दूर जाताना या जिवाला दोषांचे कलंक लावून निसटून जातोस. अशा गोष्टीवर कोणी स्तुतिसुमने उधळेल काय? तू आमचे अखंड रक्षण कर.

अंड उपजत दोन हे ब्र
ह्मांड आणि तसेच हे पिं
डांड संगम स्थूलकारणसूक्ष्म कायेत ।
अंड अगणित रोम कूपी
हिंडत तव अनंत तो ब्र
ह्मांड नायक तूच आम्हा रक्षि अनवरत ॥ ९७ ॥

। अंड उपजत दोन, हे ब्रह्मांड आणि तसेच हे पिंडांड, संगम स्थूलकारणसूक्ष्म कायेत ॥ । अंड अगणित रोम कूपी हिंडत तव अनंत, तो ब्रह्मांड नायक तूच आम्हा रक्षि अनवरत ॥ ९७ ॥

**भावार्थ** दोन अंडाकृतींचा उद्‌गम झाला आहे. एक हे ब्रह्मांड आणि दुसरे हे पिंडांड, हे शरीर. या शरीरात स्थूल, कारण आणि सूक्ष्म यांचा संगम झाला आहे. तुझ्या अनंत केशकूपात अशा अगणित अंडाकृती भटकत आहेत. तूच तो ब्रह्मांडनायक आहेस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** स्थूल, कारण आणि सूक्ष्म अशी तीन प्रकारची शरीरे मानली जातात. स्थूल शरीर पंचमहाभूतांपासून बनते. सूक्ष्म शरीर पंचप्राण, पाच ज्ञानेन्द्रिये, पाच कर्मेन्द्रिये, मन आणि बुद्धी यांनी बनते. कारण शरीर स्थूल व सूक्ष्म शरीरांचे कारण आहे. आत्म्याचा अनुभव नसल्यामुळे जी अविद्या उत्पन्न होते ते कारण शरीर होय.

**एक दिनरजनीत चालत**
**एकवीस हजार षटशत**
**अर्कसोमश्वसन सप्तम भाग जो प्राप्त ।**
**एकवटुनी योगचक्री**
**टाकती अर्पून हृदयी**
**ठाकसि मुनिजनांस आम्हा रक्षि अनवरत ॥ ९८ ॥**

। एक दिनरजनीत चालत एकवीस हजार षटशत अर्कसोमश्वसन, सप्तम भाग जो प्राप्त ॥ । एकवटुनी योगचक्री टाकती अर्पून, हृदयी ठाकसि मुनिजनांस, आम्हा रक्षि अनवरत ॥ ९८ ॥

**भावार्थ** दिवसरात्रीच्या एका चक्रात सूर्यचंद्रनाडींच्या द्वारे एकवीस हजार सहाशे वेळा श्वसन चालते. त्याचा प्राप्त झालेला एक सप्तमांश

भाग योगचक्रांमध्ये एकवटून जे तुला अर्पण करतात, अशा मुनिगणांच्या हृदयात तू येऊन ठाकतोस. तू आमचे अखंड रक्षण कर.

**पळत सत्वर म्हणत मल मल**
**कळवळून विसरत मूत्रद**
**बिळच अपुला जननपथ अस्वस्थचि मनात ।**
**जळडुबी घेऊन ना नि**
**र्मळ तनु बनत तू जर वसत**
**मळ कसा राहील आम्हा रक्षि अनवरत ॥ ९९ ॥**

। पळत सत्वर म्हणत मल मल कळवळून, विसरत मूत्रद बिळच अपुला जननपथ, अस्वस्थचि मनात ॥ । जळडुबी घेऊन ना निर्मळ तनु बनत, तू जर वसत मळ कसा राहील? आम्हा रक्षि अनवरत ॥ ९९ ॥

**भावार्थ** विशिष्ट वर्गातील माणसे पाहिल्यावर घाण, घाण असे म्हणत काही लोक कळवळून पळतात. आपला जननमार्ग मूत्रबिळातूनच गेला होता हे विसरून ते मनात अस्वस्थ होतात. पाण्यात डुबकी मारून हे शरीर निर्मळ थोडेच होणार आहे! या तनूत जर तुझे वास्तव्य आहे, तर त्यात मळ राहीलच कसा? तू आमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** विशिष्ट वर्गातील माणसे पाहिल्यावर घाण, घाण असे म्हणणे ही पूर्वीच्या काळी घडणारी घटना आज गैरलागू आहे.

**जर न जाणत सत्य नि अहं**
**करत निंदत भक्त जे तुज**
**शरण पढणे वेदशास्त्रपुराण फलरहित ।**
**नर करी दुष्कर्म मिळते**
**दुरितमुक्ती एक नाम**
**स्मरण करताचि तव आम्हा रक्षि अनवरत ॥ १०० ॥**

। जर न जाणत सत्य नि अहंकरत निंदत भक्त जे तुज शरण, पढणे वेदशास्त्रपुराण फलरहित ॥ । नर करी दुष्कर्म, मिळते दुरितमुक्ती एक नामस्मरण करताचि तव, आम्हा रक्षि अनवरत ॥ १०० ॥

**भावार्थ** जर तुझे सत्य न जाणता, तुला शरण असलेल्या भक्तसेवकांची जो अहंकाराने निंदानालस्ती करतो, त्याने वेदशास्त्रपुराणे यांचे अध्ययन केले तरी त्याला त्याचे फळ मिळत नाही. मग त्याचा काय उपयोग? माणसाने दुष्मर्म केले तरी तुझे एक नामस्मरण करताच त्याला सर्व संकटांपासून मुक्ती मिळते. तू आमचे अखंड रक्षण कर.

**बोलता उष्टे बनत ते**
**बोल उष्टे जलचरे जल**
**घ्याल ते उष्टे पिलू उष्टे पय बनवत ।**
**चालते जगतात सर्व प**
**हाल उष्टे काय उष्टे**
**खोलुनी जर बघत आम्हा रक्षि अनवरत ॥ १०१ ॥**

। बोलता उष्टे बनत ते बोल उष्टे, जलचरे जल घ्याल ते उष्टे, पिलू उष्टे पय बनवत ॥ । चालते जगतात सर्व पहाल उष्टे, काय उष्टे खोलुनी जर बघत? आम्हा रक्षि अनवरत ॥ १०१ ॥

**भावार्थ** उष्टे, उष्टे असे बोलताना ते बोलच उष्टे होतात. पाणी घ्याल तर ते जलचरांनी उष्टे केलेले असते. वासरांनी दूध उष्टे केलेले असते. तसे पहाल तर दिसेल की या जगात सर्व काही उष्टेच आहे. पण जरा उलगडून पहाल तर काय बरे उष्टे दिसेल? काही नाही. कारण सर्व तूच तर देतोस. तू आमचे अखंड रक्षण कर.

ऐकणे जन हरिकथा ही
ऐकुनी ऐकवित जा धरि
एक हरिभक्ती मनी परमपद सेवीत ।
टाकणे विषयसुख हृदया
जिंकणे मुक्तिललनेच्या
ही कर कृपा वरद आम्हा रक्षि अनवरत ॥ १०२ ॥

। ऐकणे जन हरिकथा ही, ऐकुनी ऐकवित जा, धरि एक हरिभक्ती मनी, परमपद सेवीत ॥ । टाकणे विषयसुख, हृदया जिंकणे मुक्तिललनेच्या ही कर कृपा वरद, आम्हा रक्षि अनवरत ॥ १०२ ॥

**भावार्थ** जन हो, मी सांगत असलेली ही हरिकथा ऐकावी, ती ऐकून दुसऱ्यांना ऐकवीत जावे. तुझ्या परमचरणांची सेवा करत विषयसुखांचा त्याग करावा व मुक्तिललनेचे हृदय जिंकावे, असा वर देण्याची कृपा करावी. तू आमचे अखंड रक्षण कर.

गात अच्युत नाम मी हे
नूतन धरेवर मनी वि
ख्याति न धरत घेत कथिले भामिनी वृत्त ।
नीतिकोविद परिसती जर
प्रीत धरुनी श्रोतृवृंदा
देत आनंद सुख चेन्निगराय अनवरत ॥ १०३ ॥

। गात अच्युत नाम मी हे नूतन धरेवर मनी विख्याति न धरत, घेत कथिले भामिनी वृत्त ॥ । नीतिकोविद परिसती जर प्रीत धरुनी, श्रोतवृंदा देत आनंद सुख चेन्निगराय अनवरत ॥ १०३ ॥

**भावार्थ** मनात प्रसिद्धीची अपेक्षा न धरता मी हे अचुताचे नामगान या धरतीवर नव्याने भामिनी वृत्तामध्ये वर्णिले आहे. धर्मशास्त्रात

प्रवीण असलेले जन स्नेहभावे हे ऐकतील तर सर्व श्रोतृवृंदाला राजसरूप चेन्निगराय अच्युत अखंड आनंद व सुख देईल.

**टीपा** चेन्निगराय मंदिर बेलूर येथे आहे. चेन्निग या शब्दाचा अर्थ राजस, सुंदर असा आहे.

**बादरायण उक्त भारत**
**आदिकर्ता श्रीपुरस्थित**
**आदिकेशवमूर्तिला हे वाहतो चरित ।**
**मेदिनीवर ऐकती सं**
**वाद हा प्रेमे तया हो**
**आदिमूर्ती केशव कृपावंत अनवरत ॥ १०४ ॥**

। बादरायण उक्त भारत आदिकर्ता श्रीपुरस्थित आदिकेशवमूर्तिला हे वाहतो चरित ॥ । मेदिनीवर ऐकती संवाद हा प्रेमे तया हो आदिमूर्ती केशव कृपावंत अनवरत ॥ १०४ ॥

**भावार्थ** वेदव्यासमुनींनी उच्चारलेल्या महाभारताचा आदिकर्ता श्रीपुरवासी आदिकेशवमूर्ती, त्याच्या चरणी मी ही चरितकथा वाहतो. या पृथ्वीवर जे जन प्रेमाने माझे हे भाषण ऐकतील त्यांच्यावर आदिमूर्ती केशवाची अखंड कृपा राहील.

**कुलगिरीसंयुक्त धरती**
**जलधि पावक मरुत भास्कर**
**जल गगन तारे शशि असत जोवर जगात ।**
**विलयमुक्त चरित्र नित्य ल**
**कलकत तुझे या धरेवर**
**ललित चेन्निगराय आम्हा रक्षि अनवरत ॥ १०५ ॥**

। कुलगिरीसंयुक्त धरती जलधि पावक मरुत भास्कर जल गगन तारे शशि असत जोवर जगात ॥ । विलयमुक्त चरित्र नित्य लकलकत तुझे या रिवर ललित चेन्निगराय, आम्हा रक्षि अनवरत ॥ १०५ ॥

**भावार्थ** अविभक्त कुलगिरी धारण करणारी धरती, समुद्र, अग्नी, वारा, सूर्य, पाणी, आकाश, चंद्र आणि तारे हे जोपर्यंत जगात आहेत, तोवर तुझी अविनाशी चरित्रगाथा या धरेवर अखंड लकलकत राहील. हे सुंदर चेन्निगराया तू अमचे अखंड रक्षण कर.

**टीपा** महेन्द्र, मलय, सह्य, शक्तिमान, विंध्य, पारियात्र, ऋष्य हे प्रमुख पर्वत कुलगिरी मानले जातात.

**दान शत दुहितांस गंगा**
**स्नान इच्छे तोषुनी गो**
**दान विप्रा अग्रहारग्रामशत मुदित ।**
**दान यासम भक्तिसारा**
**तून लाभे पुण्य ऐका**
**कान देऊन जन आम्हा रक्षि अनवरत ॥ १०६ ॥**

। दान शत दुहितांस, गंगास्नान, इच्छे तोषुनी गोदान विप्रा, अग्रहारग्रामशत मुदित ॥ । दान, यासम भक्तिसारातून लाभे पुण्य, ऐका कान देऊन जन, आम्हा रक्षि अनवरत ॥ १०६ ॥

**भावार्थ** शंभर कन्यादाने, गंगास्नान, ब्राह्मणांना स्वेच्छेने आनंदाने केलेले गोदान, शंभर अग्रहार गावांचे दान, यांच्याइतकेच पुण्य हरिभक्तिसाराच्या श्रवणातून लाभते. तेव्हा, जन हो, ते कान देऊन ऐका. तू आमचे अखंड रक्षण कर.

**मेरुमंदरसम हिरण्या**
**चे रच जलधितील भूमि कु**
**मारिका गोदान गायत्रि फल हो प्राप्त ।**

**सार हे हरिभक्तिचे उ**
**च्चारता अनुदिवस देई**
**चारु वर त्या आदिकेशव रक्षि अनवरत ॥ १०७ ॥**

। मेरुमंदरसम हिरण्याचे रच, जलधितील भूमि, कुमारिका, गोदान, गायत्रि फल हो प्राप्त ॥ । सार हे हरिभक्तिचे उच्चारता अनुदिवस देई चारु वर त्या आदिकेशव रक्षि अनवरत ॥ १०७ ॥

**भावार्थ** मेरू, मंदर पर्वतांएवढे सोन्याचे ढीग, समुद्रातील सर्व भूमी, कुमारिका कन्या, गोधन यांचे दान व गायत्री मंत्र यांचे जसे फळ मिळते, तसे या हरिभक्तिसाराचे पठण केल्यास त्यास तो आदिकेशव अनुदिनी उत्तम वर देऊन अखंड रक्षण करतो.

**कागिनेले स्थित नि परमु**
**त्तुंग जगती आदिकेशव**
**चांगली मति सारगाना देत मज, लिहित ।**
**सांगतचि ते आणि ऐकति**
**जे गुणी जन देत त्यासि अ**
**थांग करुणा कमलवल्लभ रक्षि अनवरत ॥ १०८ ॥**

। कागिनेले स्थित नि परमुत्तुंग जगती आदिकेशव चांगली मति सारगाना देत मज, लिहित ॥ । सांगतचि ते आणि ऐकति जे गुणी जन, देत त्यासि अथांग करुणा कमलवल्लभ रक्षि अनवरत ॥ १०८ ॥

**भावार्थ** कागिनेलेस्थित जगातील परमोच्च अशा आदिकेशवाने मजवर कृपा करून मला हे हरिभक्तिसार गाण्यास सांगितले. जे गुणी जन ते लिहितात, सांगतात आणि जे ऐकतात त्यांना अथांग करुणादान करून कमलवल्लभ त्यांचे रक्षण करतो.

टीपा  कागिनेले हे संत कनकदासांशी जोडलेले कर्नाटकातील स्थान आहे.

* * *

## ॥ मंगलम् ॥

मंगल सकल आदिभूता
मंगल सकलरक्षकाचे
मंगल तयाचे समावी लोक जो आत ।
मंगल असो परममुक्ता
मंगल असो सत्यरूपा
मंगल असो केशवाचे चेन्न श्रीनाथ ॥ १ ॥

। मंगल सकल आदिभूता, मंगल सकलरक्षकाचे, मंगल तयाचे समावी लोक जो आत ॥ । मंगल असो परममुक्ता, मंगल असो सत्यरूपा, मंगल असो केशवाचे चेन्न श्रीनाथ ॥ १ ॥

**भावार्थ** सर्व मूलोत्पन्न भूतजातांचे मंगल असो. सर्वांच्या रक्षणकर्त्याचे मंगल असो. जो सर्व ब्रह्मांडाला स्वतःमध्ये सामावून घेतो त्याचे मंगल असो. जो परमस्वतंत्र आहे त्याचे मंगल असो. सत्यस्वरूपाचे मंगल असो. श्रीनाथ चेन्नकेशवाचे मंगल असो.

टीपा  बेलूरू येथे चेन्नकेशवाचे मंदिर आहे. चेन्न किंवा चेन्निग याचा अर्थ सुंदर, राजस असा आहे. कागिनेले या संत कनकदासांच्या गावी आदिकेशवाचे मंदिर आहे.

मंगल जगतआदिमूर्ती
मंगल महापुण्यकीर्ती
मंगल तयाचे करी जो नक्र चक्रहत ।

मंगलचि कृष्णारख्याचे
मंगल ध्रुवराजवरदा
मंगल असो केशवाचे बेलुरु सुरूप ॥ २ ॥

। मंगल जगतआदिमूर्ती मंगल महापुण्यकीर्ती मंगल तयाचे करी जो नक्र चक्रहत ॥ । मंगलचि कृष्णारख्याचे मंगल ध्रुवराजवरदा मंगल असो केशवाचे बेलुरु सुरूप ॥ २ ॥

**भावार्थ** जगाच्या आदिमूर्तीचे मंगल. महान पुण्यकीर्तीचे मंगल. ज्याने सुदर्शनचक्राने दुष्ट मगरीला हत केले त्याचे मंगल. द्रौपदीचे रक्षण करणाऱ्याचे मंगल. ध्रुवराजाला वर देणाऱ्याचे मंगल. बेलूरच्या सुंदर चेन्नकेशवाचे मंगल.

जयसुरेंद्रवरार्चितचरण
जय पुराधिपसंस्तुतात्मा
जय महामुनि गम्य योगे मेघवर्णांग ।
जय जनकजामुखकमलरवि
जय कलाधिपसूर्यसुनयन
जय निरंजन चेन्नकेशव जय जगन्नाथ ॥ ३ ॥

। जयसुरेंद्रवरार्चितचरण जय पुराधिपसंस्तुतात्मा जय महामुनि गम्य योगे मेघवर्णांग ॥ । जय जनकजामुखकमलरवि जय कलाधिपसूर्यसुनयन जय निरंजन चेन्नकेशव जय जगन्नाथ ॥ ३ ॥

**भावार्थ** सुरराजश्रेष्ठ इंद्र ज्याच्या चरणांची पूजा करतो त्याचा जय असो. देवनगरीचा अधिपती ज्याची महत् स्तुती करतो त्याचा जय असो. योगाचरणातून जो उमगतो त्या मेघवर्णाचा जय असो. जनककन्येच्या मुखकमलाचा जो सूर्य त्याचा जय असो. ज्याचे नयन चंद्रसूर्याप्रमाणे चमकतात त्याचा जय असो. सर्वज्ञ चेन्नकेशवाचा जय असो. जगन्नाथाचा जय असो.

**References :**

**Kanakadasa Kavya Samputa** (2011) - Compilation by Prof. A.V. Navada, Published by Kanakadasa Adhyayana Samshodhana Peetha, Rashtrakavi Govinda Pai Samshodhana Kendra, M.G.M. College, Udupi, Karnataka

*Note : The above book is regarded as authentic. In our work all the verses are taken from this book, word to word.*

**Haribhakthisara** (2008) - Explanation in Kannada by Vidwan N. Ranganatha Sharma, Published by Kanakadasa Adhyayana Samshodhana Peetha, Rashtrakavi Govinda Pai Samshodhana Kendra, M.G.M. College, Udupi, Karnataka

**Haribhakthisara** (2011) - Explanation in Kannada by Dr. Siddanna F. Jakabala, Published by Kaginele Abhivriddhi Pradhikara Kaginele (Haveri Dist), Karnataka

**Haribhakthisaram** (2011) - Translated into Sanskrit by Shatavadhani Dr. R. Ganesh, Published by Kanakadasa Adhyayana Samshodhana Peetha, Rashtrakavi Govinda Pai Samshodhana Kendra, M.G.M. College, Udupi, Karnataka

**Haribhakthisara - Essence of Devotion** (2019) - Translated to English by A. Narasimha Bhat, Published by Kanakadasa Adhyayana Samshodhana Peetha, Rashtrakavi Govinda Pai Samshodhana Kendra, M.G.M. College, Udupi, Karnataka

**Dashavatara** (1981) - G. B. Soolibhavi, Published by M.S.P.C. Shabadimatha, Book Depot, Gadag, Karnataka

**Mahabharata** - Retold by Krishna Dharma (2013) - Kenneth Anderson, Published by Torchlight Publishing Inc. (9th printing - Revised), Badger, California, USA

**Shree Vishnu Purana** (1997) - Raghavendra Acharya, Published by Shree Ganesh Prakashana, Balepete, Bengaluru

**With help from :**

**Sankshipta Kannada Nighantu** - Kannada-Kannada dictionary, Edited by Prof. G. Venkatasubbaiah, Published by Kannada Sahitya Parishattu – 1977 (first edition), Chamarajapete, Bengaluru

**Kasturi Kosha** - Kannada-Kannada dictionary, Pandit C.A. Kavali Published by Chaitanya Prakashana - 2019 (latest edition) Shivananda Nagara Main Road, Dharwar, Karnataka

**Achchagannada Nudikosha** - Kannada-Kannada dictionary, Vidwan Kolambe Puttannagowda, Published by Pustaka Prakashana – 2011 (fourth edition), Saraswatipuram, Mysuru, Karnataka

**Navneet** – Marathi-English-Marathi dictionary. Compiled by S.R. Prabhudesai and Edited by Chandrakant J. Margaj, Navneet Publications India Ltd. – 2011 (sixth edition) Bhavanishankar Road, Dadar, Mumbai

**A Sanskrit English Dictionary** - Sir Monier Monier Williams, Published by Oxford University Press in 1899.

**पर्याय शब्दकोश, Marathi Marathi English Thesaurus** - V. S. Thakar, Published by Mehta Publishing House in 2000.

**मराठी शब्दलेखनकोश** - Prof. Yasmin Sheikh, Published by Hermes Prakashan in 2007.

# अनुवादकांचा अल्प परिचय
## आल्हाद गोविंद आपटे



श्री आल्हाद आपटे हे मा. पंतप्रधानांच्या अखत्यारीतील नॅशनल टेक्निकल रिसर्च ऑर्गनायझेशन, दिल्ली या तंत्रज्ञानीय गुप्तचर संस्थेचे माजी प्रमुख, आणि भाभा परमाणु अनुसंधान केन्द्र मुंबई येथील निवृत्त उत्कृष्ट वैज्ञानिक व सुपरकॉम्प्युटिंग सुविधेचे प्रमुख आहेत. संगणक नेटवर्क, सायबर सुरक्षा, महासंगणन (सुपरकॉम्प्युटिंग), ग्रिड संगणन ही त्यांची विशिष्ट कार्यक्षेत्रे आहेत. त्यांनी राष्ट्रीय स्तरावरील अनेक वर्गीकृत प्रकल्पांत महत्त्वाचे योगदान दिले आहे. आंतरराष्ट्रीय अणुऊर्जा एजन्सीच्या सायबर सुरक्षेशी संबंधित अणुकेन्द्रांच्या सायबर सुरक्षा विषयक सल्लागार समितीवर त्यांनी महत्त्वाचे कार्य केले आहे. युरोपियन युनियनच्या ग्रिड संगणन प्रकल्पामध्ये त्यांनी भारतातर्फे कार्य केले आहे. २००७ साली त्यांना अणुऊर्जा विभागाचा 'स्पेशल कॉन्ट्रिब्यूशन अॅवार्ड' हा पुरस्कार प्राप्त झाला.

विज्ञान विषयक लेखन व संगीत या विषयात त्यांना गती आहे. महाराष्ट्र शासनाच्या मराठी विश्वकोशामधील अनेक संगणकविषयक नोंदींचे लेखन त्यांनी केले आहे. त्यांचे 'संदेशायन' हे पुस्तक 'ग्रंथाली'ने १९९८ मध्ये तर 'भारताची अणुगाथा' हे पुस्तक मनोविकास प्रकाशनाने २०१७ मध्ये प्रकाशित केले.

कन्नड संत पुरंदरदास यांच्या काही भक्तिगीतांचा मराठी अनुवाद त्यांनी केला असून याचा श्री सुरेश राव यांच्यासह निर्मिलेला 'देखिले गोविंदाला' हा संगीत अल्बम २०११ साली प्रकाशित झाला. त्यांनी श्री सुरेश राव यांच्यासह स्वरबद्ध केलेल्या संत मीराबाई यांच्या भक्तिगीतांचा 'गोपाल प्यारे' हा अल्बम मार्च २०१७ मध्ये प्रकाशित झाला.

* * *



# सुरेश राव

श्री सुरेश राव यांनी उडुपी येथील एम.जी.एम. महाविद्यालयातून १९६८ साली रसायनविज्ञानतील बी.एस्सी. अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर ते १९६९ मध्ये भाभा परमाणू अनुसंधान केंद्रात (बी.ए.आर.सी.) सायंटिफिक ऑफिसर म्हणून रुजू झाले. औद्योगिक क्षेत्र, वैद्यकीय आस्थापना, शैक्षणिक व संशोधन संस्था, अणुभट्टी, न्यूक्लियर त्वरित्रे आणि भारतीय नौदल या क्षेत्रांतील विकिरण मापनविज्ञान आणि विकिरण सुरक्षितता ही प्रामुख्याने त्यांची कार्यक्षेत्रे राहिली आहेत. भारतीय सैन्यद-लातील एन.बी.सी. (न्यूक्लिअर, बायोलॉजिकल, केमिकल) प्रयोगशाळांची स्थापना करण्यात त्यांनी मोठे योगदान दिले आहे. बी.ए.आर.सी. च्या रेडिएशन स्टॅण्डर्ड अनुभागाच्या प्रमुखपदावरून ते २००८ साली निवृत्त झाले.

ते एक स्वशिक्षित संगीतज्ञ असून त्यांनी शास्त्रीय संगीताचा प्रयोग असलेल्या लोकसंगीत व सुगम संगीताच्या अनेक कार्यक्रमांची निर्मिती व संचालन केले. त्यांनी मदन मोहन, सलिल चौधरी व रोशन यांच्यावरील सेमिनारचे संचालन केले. त्यांनी नंतर मदन मोहन आणि सलिल चौधरी यांच्यावरील ग्रंथांचे संपादन केले. सलिल चौधरींवरील ग्रंथाच्या त्याच्या कार्याबद्दल कलकत्त्याचे मेयर व रवीन्द्र भारती विश्वविद्यालयाचे उपकुलगुरू यांनी त्यांचा सत्कार केला.

कन्नड संतकवी पुरंदरदास यांच्या कृतींचा मराठी अनुवाद आणि संत मीराबाईच्या भक्तिरचनांचा अल्बम या श्री आल्हाद आपटे यांच्यासह केलेल्या निर्मितीनंतर त्यांनी बसवण्णांच्या चाळीस कन्नड वचनांचा कवी डॉ. कुलवंत सिंग यांच्या सहकार्याने केलेला हिंदी अनुवाद हे त्यांचे आणखी एक भूषणावह कार्य होय.

* * *

दासवरेण्य कनकदास विरचित

# हरिभक्तिसार

मराठी रूपांतर - भावार्थसहित



कनकदास अध्ययन संशोधन पीठम्
राष्ट्रकवि गोविंद पै संशोधन केंद्र, माहे
एम.जी.एम. महाविद्यालय कॉम्प्लेक्स,
उडुपि - ५७६ १०२

**Rs. 45/-**